# शब्दसिद्धिनिबंध.

हाग्रंथ.



विष्णुभास्करदेव गडबोले

यांणीं

भास्कर अनंत शास्त्रीतामणकर.

यांच्यासाह्यानें-

करून.

मुंबईत.

हरीलींगुकदम यांच्या शिलाछा

पावर

छापिला.



शके १७८९ प्रभवनामसंवत्सरे श्रावणवद्यसप्तमी.

भृगुवार तारीख २३ आगष्ट सन १८६७

प कित्येक ठिकाणीं त्याहूनही भिन्न अर्थ होतात. तरूदावरून

## प्रस्तावना.

हा हाल्लीं व्यवहारांत जी महाराष्ट्र भाषा चालते तींत संस्कृत भाषेंतून अपभ्रंश होऊन ते शब्द व कांहीं संस्कृतही प्राकृत भाषेंत मिश्र जाहाले आहेत. त्या शब्दांचा अर्थ समजल्यानें प्राकृत व संस्कृत भाषेच्या कविता, आर्या, श्लोक, साक्या वगैरे समजण्यास फार सुलभ पडेल आणि शब्दाचा मूळधातू कोण, त्याचा अर्थ काय व कोणत्या अर्थी प्रत्यय कोणता जाहाला आहे. हें समजल्यानें शब्दांच्या अवयवार्थाचें ज्ञान चांगलें होऊन प्राकृत व संस्कृत व्याकरण शिकण्यास तर फारच उपयोग या ग्रंथाचा व्हावा असा ग्रंथकर्त्यानें अभिलाष धरून संस्कृत व्याकरणांतील मुख्य मुख्य सर्व विषय संक्षेपानें लिहिले आहेत.

संस्कृत धातू येकंदर बावीसशें आहेत. त्या सर्वांचा उपयोग भाषेंत लागतो असें नाहीं. यास्तव ज्या शब्दांचा व्यवहारांत उपयोग फार त्यांचे मूळधातू ९२५ लिहून त्यांचे अर्थ व त्यावरून कोणत्या अर्थी कोणता प्रत्यय होऊन शब्द सिद्ध जहाले ते सर्व रामाश्रमी कोशाच्या टीकाधारानें लिहिले आहेत.

उपसर्गयुक्त शब्द भाषेंत फार येतात व यास्तव पहिल्यानें उपसर्ग लिहून त्यांचे अर्थ आणि उदाहरणें लिहिलीं आहेत. तथापि कित्येक ठिकाणीं त्याहूनही भिन्न अर्थ होतात. ते रूढीवरून

समजावे. सर्वच अर्थ लिहूं लागल्यास विस्तार फार होईल ह्मणू न येथें लिहिले नाहींत.

धातूं वरून जे प्रत्यय होतात त्यांतून मुख्य प्रत्यय व त्यांचीं रूपें कोशाचे आरंभीं लिहिलीं आहेत, हे सर्व प्रत्यय सर्वच धातूं वरून होतात असा नियम नाहीं. संस्कृत व्याकरणाच्या निय माप्रमाणें होतात. हें संस्कृत व्याकरणावरून समजेल.

प्रथम धातू लिहून त्यापुढें कंसांत त्याचे अनुबंध लिहिले आहेत. नंतर धातूंचे अर्थ लिहून, पर्यवसित रूपें (असल्यास) लिहिलीं आहेत. त्यापुढें धातूपासून झालेले जे शब्द, ते भूता- र्थक विशेषणें, इतरविशेषणें, नामें, भाववाचकें आणि अव्यय असे लिहिले आहेत. कठिण शब्दाचे अर्थ कंसांत जेथचे तेथेंच लिहिले आहेत.

संस्कृत शब्दांच्या धातू मागें अव्ययरूपी जे शब्द लागतात त्यांस उपसर्ग ह्मणतात. त्यांचे अर्थ व धातू वरून जे प्रत्यय होता त ते व त्यांचे अर्थ व ते प्रत्यय झाले असतां धातूंस विकार कोण ते होतात, व धातू आणि प्रत्ययाच्या संधी कशा होतात हा सर्व प्रकार प्रथमतः लिहून धातूंच्या अक्षरानुक्रमानें, कोश लिहि ला आहे. कोशाच्या पुढें धातुसाधित शब्दांवरून स्त्री प्रत्यय होतात. ते व त्यांचे समास आणि त्यां वरून अनेक अर्थी प्रत्यय

होऊन, वहिनांत नामें होतात; त्यांच्या मुख्य जाती संक्षेपें करून वशेवटीं विभक्तींचे अर्थ लिहिले आहेत.

संस्कृत धातुपाठांत धातूस अनुबंध लिहिले आहेत. ते कित्येकांस मागें, कित्येकांस पुढें आणि कित्येकांस मागें व पुढें असे लिहिले आहेत. या अनुबंधांचा उपयोग या कोशांत इतकाच आहे कीं एकसारिखेच धातू असून त्यांचे अर्थ व रूपें निरनिराळीं आहेत. ते भेद अनुबंध भेदानें समजतात.

धातूपासून झालेले जे शब्द लिहिले आहेत. त्यांची परिभाषा.

भू० ह्मणजे भूतकालिकविशेषण.

वि० ,, विशेषण.

ना० ,, नाम.

भा० ,, भावार्थक.

संस्कृत प्रत्यया प्रमाणेंच नामें किंवा विशेषणें या कोशांत लिहिलीं नाहींत. कारण संस्कृत व्याकरणांत एकशब्द नाम असून तोच शब्द विशेषणही होतो. यास्तव कित्येक ठिकाणीं भूतार्थक प्रत्यय असतांही व्यवहारांत विशेषणभासलें तेथें तो शब्द विशेषणांत लिहिला आहे. तसाच भाववाचक प्रत्यय असतां तो शब्द नामांत लिहिला आहे. कित्येक ठिकाणीं करणीं

प्रत्यय झाला असून ही तो शब्द भावार्थकांत लिहिला आहे.

या ग्रंथाचा अभ्यास
मुलांकडून कर
विणेंस्या
चाम-
कार.

प्रथम मुलांस संधी कशा होतात ह्या दाखवून नंतर त
द्धित प्रत्ययाचें ज्ञान शिष्यांस करून संस्कृत कोशाचा, व सं
स्कृत व्याकरणाचा अभ्यास मुलांस करावा.

# धातूंचा अर्थ विशेषाला दाखविणारे अव्ययभूत उपसर्ग २२ आहेत. त्यांचे सामान्य अर्थ.

१ प्र. { आधिक्य. उत्कर्ष. धात्वर्थविपर्यास. उ० १ प्रगल्भ (विशेषधैर्यवान) २ प्रभंजन ३ (मोठवारा) ३ प्रस्थित (आयासनिघाले ला.)

२ परा. { मागें. उलट. उ० १ पराङ्मुख (मागें तोंड फिरलेला) २ पराजित (विपरीत जय झालेला) ३ पराक्रम (सामर्थ्य)

३ अप. { खालीं. वाईट. दूर. पूजा. उ० १ अपान (गुदवायू) २ अपशब्द ३ अपास्त (दूर टाकलेला) ४ अपचित (पूजित.)

४ सम्. { चांगलें. संहत. उ० १ सम्राट् (चांगलाराजा. सार्वभौम) २ संस्कृत. (चांगलें केलेलें) ३ संज्ञु: (संहतजानु:)

५ अनु. { मागून. गौणार्थ. आनुकूल्य. उ० १ अनुज (मागून झालेला.) २ अनुकल्प. (प्रतिनिधी) ३ अनुबंध. (अनुसरून चालणें.)

६ अव. { न्यूनता. विशेष. खालीं. व अत्यंत. उ० १ अवमान (कमीमान) २ अवतंस (तुरा) ३ अवनत (अधोमुख) ४ अवमर्द (अत्यंत मर्दन)

७निस्. { गेलेला. अत्यंत. उ० १ निःस्व (दरिद्री) २ निःश्रेयस (अत्यंत कल्याण)

८निर्. { गेलेला. अत्यंत. अभाव. उ० १ निरामय (रोगरहित.) २ निर्जितः (अत्यंत जिंकिलेला) ३ निर्जर (देव.)

९दुस्. { दुष्ट. दुःख उ० १ दुष्कृत (पाप) २ दुस्त्यज (टाकणें कठीण)

१०दुर. { कठीण. निंद्य. उ० १ दुर्बोध (समजणें कठीण.) २ दुर्गति (निंद्यगति)

११ वि. { गेलेला. आधिक्य. उलट. अनेकत्व उ० १ विधवा २ विज्ञान. ३ विपक्ष. (शत्रू) ४ वितान (अनेक वस्त्र निर्मित चांदवा).

१२आङ्. { किंचित्. व्याप्ति. मर्यादा. उ० १ आकंपित. (किंचित्कापलेला) २ आबालवृद्ध (बाल वृद्ध सुद्धां) ३ आसमुद्र (समुद्रपर्यंत.)

१३नि. { अत्यंत. रहित. नीच. उ० १ निबोध. (अत्यंत जाणणें) २ निवात (वातरहित) ३ निकृत. (नीचीकृत)

१४अधि. { शंडे. वर. श्रेष्ठत्व. तिरस्कार. उ० १ अधिभू. (भूमीवेगाई) २ अधित्यका (पर्वतावरची भुई) ३ अधिपती. ४ अधिक्षिप्त. (तिरस्कृत)

१५ अपि. { आच्छादन. समुच्चय. उ० १ अपिधान (आच्छादन) २ त्वमपि (त्वाही) }

१६ अति. { आधिक्य. उल्लंघन. उ० १ अत्युत्तम २ अतिवेलं (वेळा उल्लंघिल ज्याला) ३ अतिपंथा (चांगला मार्ग) }

१७ सु. { सोपें. चांगलें. अत्यंत. उ० १ सुकर (करण्यास सोपें.) २ सुवर्ण ३ सुगोप्य (अत्यंतगोप्य) }

१८ उत्. { वर. श्रेष्ठ. समुच्चय. उ० १ उत्कृष्ट (वर ओढलेला) २ उत्कर्ष (श्रेष्ठ) ३ विष्णुं उत् शिवं (विष्णू आणि शिव) }

१९ अभि. { आसमंतात् श्रेष्ठ्य उ० १ अभिवर्त्तमान. (आसमंतात् राहाणारा) २ अभिजन (श्रेष्ठजन) }

२० प्रति. { उलट. वीप्सा. बदली. उ० १ प्रत्युत्तर २ प्रतितीर्थ (प्रतितीर्थी) ३ प्रतिनिधि (जामीन) }

२१ परि. { आसमंतात् अत्यंत. समीप. उ० १ परिक्षिप्त (वेढलेला) २ परित्याग (अत्यंत त्याग) ३ परिणय (विवाह) लग्न. }

२२ उप. { जवळ. आधिक्य. दुसरा. उ० १ उपनयन (जवळनेणें) २ उपचित (अधीक वाढलेला) ३ उपपति (दुसरा उपपती जार.) }

---

## अव्ययें.

१ आः कोप. पीडा उ० १ आः पापकिंविकत्थसे (हे पाप्या कां श्लाघा क

| | |
|---|---|
| | रितोस.) आ: शीनं (अतिपीडाकरयं ड्री.) |
| २ धिक्. निर्भर्त्सन. निंदा. (वाईट बोलणें) | उ० १ धिक्त्वां अनध्ययनशीलं (नपढणाऱ्यातुला धि:कार असो.) २ धिक्परस्त्रीगामिनं (परस्त्रीप्रत गमन करणाऱ्यातुला धि:कार असो. |
| ३ च. परस्परानुषंग. इतरेतरं. | उ० १ भिक्षामट गांचानय (भिक्षेला फिर गाई आण) २ धवश्च खदिरश्च धवखदिरं (धव आणि खैर) |
| ४ स्वस्ति. आशीर्वाद. सुख. | उ० स्वस्ति ते भूयात्. (कल्याण असो तुजें) २ स्वस्ति गच्छ (सुखानें जा.) |
| ५ स्वित्. प्रश्न. वितर्क. | उ० १ किंस्वित्कुशलं (तुमचें कुशल आहे कीं)? २ सर्वेश्वरत्वं विष्णो: स्वित् शिवस्य (सर्वेश्वरत्व विष्णूला कीं शिवाला) |
| ६ सकृत्. एकवार. बरोबर. | उ० १ सकृत् याति (एकवेळ जातो) २ सकृद्यांति (बरोबर जातात) |
| ७ आरात्. दूर. समीप. | उ० १ आराच्छत्रोर्वसेत (शत्रूपासून दूर राहावें) २ आरात्सख्युर्वसेत (मित्राला समीप राहावा) |

| | |
|---|---|
| ८ पश्चात्. पश्चिमदिशा-शेवट. | उ० १ पश्चादस्तंगतोरविः (पश्चिमेससूर्यास्त जाहला) २ पश्चाद्वयसि (शेवटील वयांत.) |
| ९ शश्वत्. निरंतर. सह युक्त. | उ० १ शश्वत् स्मरेद्विष्णुं. (विष्णूलानिरंतर स्मरावें) २ शिष्यैः शश्वत् गतोगुरुः (शिष्यांशीं युक्त गुरु गेला.) |
| १० साक्षात्. प्रत्यक्ष. तुल्य. | उ० १ साक्षाद्दृष्टोहरिः (प्रत्यक्ष हरीपाहिला) २ साक्षाल्लक्ष्मीरियंवधूः (हीस्त्रील क्ष्मीतुल्य आहे.) |
| ११ पुरस्तात्. पूर्वदिशा. आदि. | उ० १ पुरस्ताद्दिशि (पूर्वदिशेस) २ पुरस्ताद्भुंक्ते. (आदिंजेवितो) |
| १२ यावत्. साकल्य. मान (परिमाण) अवधि.<br>१३ तावत्. यावत्शब्दाचे जे अर्थ तेच यावे. | उ० १ यावद्दत्तं तावद्भुंक्ते. (दिलें इतकें सर्व खातो)<br>उ० १ यावत्स्वर्णं तावद्रजतं (सोन्याइतकें रुपें) २ यावत्समुद्रं तावत्समुद्रं (समुद्रापर्यंत) |
| १४ अथो / अथ } मंगल. आरंभ. साकल्य. | उ० १ अथातोधर्मजिज्ञासा. २ अथशब्दानुशासनं. ३ अथो अनंतस्य गुणा न्. |
| १५ वृथा. निरर्थक व्यर्थ } विधिहीन. | उ० १ वृथागतं जीवितं (व्यर्थजीवित गेलें) |

{ २वृथा दानं (विधिहीन दान)

१५नाना. अनेकत्व. उभयार्थ. { उ० १नानाजाति: (अनेक जाति) २नाना रूपं न सज्जेत.

१६अमा. सह. समीप. { उ० १पुत्रेणामाभुंक्ते (पुत्रासह जेवितो.) २अमात्य (समीपवर्ति)

१७जोषं. उगीराहाणें. सुख. { उ० १जोषंतिष्ठ. (उगीराहा) २जोषमासीत. (सुखी राहावें)

१८किं. प्रश्न. निंदा. { उ० १किमाद्रियेरन् (आदरकरितील-काय ?) २किंराजा (वाईट राजा)

१९अलं. भूषण. पुरे. शक्ति. निवारण. { उ० १अलंकृत: शिशु: २अलंभुक्तवान् (पुरा जेवला) ३अलं महीपालो जेतुं (राजा जिंकण्यास समर्थ) ४अलं महीपा लश्रमेण. (श्रमें करून पुरे)

२०मिथ: परस्परार्थ. एकांत. { उ० १वासिष्ठानां मैत्रावरुणानां मिथोन विवाह: (वासिष्ठगोत्र व मैत्रावरुणांचा परस्पर विवाह होत नाहीं) २मिथो मंत्रायंते. (एकांतीं मसलत करितात)

२१प्रादु: प्रगट. { उ० १प्रादुर्बभूव. (प्रगट होता जाहाला)

२२तिर: गुप्त. वांकडें. { उ० १तिरोभूयास्ते (गुप्त राहावें) २तिरो वर्तते चंद्र:

२३ चिराय दीर्घ काळ उ० १ चिरायसंचितं (बहु काळानें मि
चिरस्य ळविलें)
२४ अभीक्ष्णं वारंवार उ० १ अभीक्ष्णंकृतं मुहुः कृतं (वारंवा
मुहुः र केलें.)
२५ विना. वांचून. उ० १ तेनविना (त्यावांचून)
२६ जातु. कधीं. उ० १ जातुकामाद्धर्मं त्यजेत् (कधींध
र्म सोडूं नये.)
२७ तूष्णीं. मौन. उ० १ तूष्णीमास्ते (उगा राहातो)
२८ अंतरेण मध्यार्थ. उ० १ अनयोरंतरेणतिष्ठ (दोघांमध्येराहा)
२९ नीचैः अवनत. उ० १ नीचैर्विनयाद्दृश्यत (विनयानें
नम्रदिसतो)
३० उच्चैः उंच. उ० १ उच्चैर्गिरेः शृंगं (पर्वताचेंउंचशिखर)
३१ प्रायः बाहुल्य उ० १ प्रायोनववधूःकांतं (बहुधानूत
स्त्रीभियाळा)
३२ शनैः मंद मंद उ० १ शनैर्यातिपिपीलिका (मंदमंदमुंगीजाते)

---

## शब्दांच्यापूर्वींयेणारीं अव्ययें.

१ कु. वाईट निंदित १ कुबुद्धिः २ कुत्सित.

२ न. अभाव. निषेध. १ नसत्व २ नास्तिक.

३ न. (पर्यवसित) अ अभाव १ अज्ञान. २ अशेष.

४ न. (पर्यवसित) अन् अभाव १ अनर्थ २ अनवस्था

५ सत्. चांगले १ सज्जन २ सत्संगति.

६ सह. सहवर्तमान १ सहचरित (बरोबर गेलेला) सहवास.

७ सह. (पर्यवसित) स. सहित १ सदोष २ सप्रमाण.

८ पुनः फिरून १ पुनर्भव (फिरून होणें) २ पुनर्विवाह.

स्थलविशेषीं शब्दाच्या पूर्वीं दोन तीनही उपसर्ग येतात.

जसें, दुर्निवार, विपर्यास, दुराग्रह. इत्यादि.

## शब्दांतीं येणारें अव्यय.

१ अपि. जरीं, तरीं १ यद्यपि, तथापि.

## धातूंवरून प्रत्यय होतात त्यांस कृदंत म्ह णतात त्यांचे प्रकार कर्तृवाचक.

१ तृन्. तृच्चा प्रत्यय (त्याचा पर्यवसित) ता. उ० कर्ता. भर्ता २ अण्. (पर्यवसित) अ. उ० १ वस्त्रकार (वस्त्र, कृ, अ) ३ इन्. उ० भावी. पुण्यकारी ४ अन्. उ० यजमान (यज्ञ करणारा) पचमान (पाक करणारा) ५ अक्. उ० याचक, पावक, गणक. ६ अन्. उ० नंदन, भजन, ७ क्विप्. याचें रूप शब्दांत राहात नाहीं उ० वेदवित् सर्ववित्, (पंडित) ८ वसु याचा पर्यवसित वान्. उ० विद्वान्, तस्थिवान् ९ इष्णु. उ० सहिष्णु, अ

पकरिष्णु १० उक. उ० भावुक, घातुक, पातुक ११ आलु. उ० निद्रालु कृपालु. १२ उ. उ० भिक्षु, इच्छु, मुमुक्षु. १३ इत्र. उ० चरित्र, धवित्र (पंखा) १४ उण्. पर्यवसित उ. उ० कारुः (कारागीर) वायुः पायु (गुद) स्वादु. साधु. १५ इक् पर्यवसित. इ. उ० कृषिः (शेती) गिरिः (पर्वत) १६ क्वनिप् पर्यवसित वन्. उ० पारदृश्वा (पारानें पाहाणारा) १७ रः पर्यवसित. र. उ० नम्रः कंप्रः (कांपणारा) १८ उकञ्. पर्यवसित उक. उ० जागरूकः (जागणारा) १९ ष्वुकन् पर्यवसित् थक. उ० गाथकः (गाणारा) २० डुः पर्यवसित् उ. उ० विभुः प्रभुः (समर्थ)

## कर्मवाचक.

१ तव्य. उ० कर्तव्य. ज्ञातव्य. २ य. उ० कार्य, ज्ञेय, देय, ३ अनीय. उ० संपादनीय, गणनीय, संस्थापनीय, ४ आन. याचा पर्यवसित यमान होतो. उ० क्रियमाण, भाव्यमान ५ त्रिम्. उ० कृत्रिम. पक्त्रिम (पक्व होण्यास योग्य)

## भूतार्थी

१ त. उ० कृत, दत्त, संपादित, अपकृष्टः; क्तवतुः या त प्रत्ययाचीं त. न, ण, म, व, ध, हीं रूपें होतात. २ न उ० ग्लान, भिन्न, म्लान, ३ ण. उ० ऋण, तृण. ४ म. उ० क्षाम (क्षीण.) ५ व. उ० पक्व ६ ध. उ० रुध्ध क्रुध्ध ७ तवतु. याचा पर्यवसित. तवान् होतो उ० तनवान्, क्षमवान् क्त्वा. पर्यवसित त्वा. उ० कृत्वा (करून) श्रुत्वा (ऐकून)

## भाववाचक ह्मणजे व्यापारवाचक.

१ अन्. उ० दान, मान, पान, २ श. याचा पर्यवसित या होतो उ० क्रिया, शय्या, माया, ३ घ याचा पर्यवसित अ होतो. उ० स्पर्श, विमर्श. ४ ति. उ० कृति, वृत्ति, धृति, ५ त. याचा पर्य० इत. उ० चरित, आकलित, ६ सन्. याचा पर्य० सा, षा, हे होतात. उ० जिज्ञासा, विजिगीषा, चिकीर्षा. १ ल्युट्. याचा पर्य० अन. उ० हसनं (हंसणें) पानं (पिणें)

## करणवाचक.

१ अन्. उ० करण, कारण, भरण, २ अ. उ० क्रम, परिघ, घन. ३ अन्. याचा पर्य० अना. उ० प्रार्थना, आराधना.

## अधिकरणवाचक.

१ अ. उ० पद, आदर्श (ज्यांत दिसतें तो) स्थळ. २ अन. उ० स्थान. (ज्यांत राहातो तें) ह्मणजे घर. शयन (निजावयाची जागा)

## भाव, व, करण, अधिकरण, या अर्थी होणारे.

१ घञ्. पर्यव० अ. उ० पाकः (स्वयंपाक) कामः (इच्छा) विश्रामः (विश्रांतिः) आहारः (खाणें) स्पर्शः २ अप्. पर्यवसि० अ. उ० स्तवः (स्तुतिः) विष्टरः (आसन) गरः (विष) पवः (पाखडण्यानें धान्य.) गमः (जाणें) स्वनः (शब्द)

## इच्छार्थी.

१ स, ष. उ० चिकीर्षित (करायास इच्छिलेले धा० ११५) शुश्रूषा (ऐकण्याची इच्छा धा० ७१८) जिगीषा (धा० २२६)

## प्रेरणेच्याअर्थी.

१ या अर्थी धातूच्या उपांत्य स्थानीं अ असल्यास आ होतो. आणि इ, उ, ऋ, असल्यास अनुक्रमें ए, ओ, अर् होतात. उ० नासित (धा० २८३) पेषित (धा० ३८२) एधित (धा० ६३५) शोभित (धा० ८३०) अर्पित (धा० ३००) २ धातूच्या अंतीं आ असल्यास त्याच्या पुढें प किंवा य होतो. आणि इकारांत धातूस आप असें होतें. उ० आज्ञापित (धा० ८३२) आख्यायिका (धा० १४०) अध्यापक-(धा० २९)

## अतिशयेंकरून आणि वारंवार क्रिया होणें याअर्थी.

१ धातूस द्वित्व होऊन य प्रत्यय होतो. उ० देदीप्यमान (धा० २०८ अतिशयें करून किंवा वारंवार प्रकाशित होणारा) २ त्का धातूस द्वित्व होऊन पर्यवसित त्वा. उ० स्मृत्वा स्मृत्वा नमति शिवं (स्मरून स्मरून शिवाला नमस्कार करितो. ३ णमुल् धातूलाही द्वित्व होऊन पर्यवसित अम्. उ० पायं पायं (पिऊन पिऊन) श्रावं श्रावं (ऐकून ऐकून)

धातूं वरून प्रत्यय झाले ह्मणजे त्यांच्या शेवटील स्वरास किंवा शेवटल्या व्यंजनाच्या मागील स्वरांस स्थल विशेषीं गुण किंवा वृद्धि हे विकार होतात. त्यांच्या योगानें रूपांत बदल होतो तो.

| स्वर. | गुण. | वृद्धि. | उदाहरणें. |
|---|---|---|---|
| अ | अ | आ | आप्य.(धा० २१९) आत्त (२२१) |
| आ | ० | आ | |
| इ,ई | ए | ऐ | जेता (२२६) छेद (२१२) नेता (२५१) अध्याय (अधि, ऐ, अ ३९) निष्प्रायक (निस्, प्रै, अक. १९४) नायक (नै, अक २५१) चैल (२००) |
| उ,ऊ | ओ | औ | प्लव.(प्लो, अ ४०५) पवमान (पो, अमान ३९१) पोषित (पोष, इ, त २९८) चोषित (चोष, इ, त २०७) रावण (रौ, अण ५५३) सौर (सौर, अ, ८३१) भाव (भौ, अ ४४५) प्रभाव (प्रभौ, अ ४४५) इत्यादि. |
| ऋ,ॠ | अर् | आर् | कर्तव्य (कृ, तव्य. ११५) निस्तरण (निस्तृ, अन २८१) संपर्क (संपृच्, अ, १९६) कार्य (कृ, य ११५) निवार्य (नि, वृ, य, ६८५) |

विदारित (वि, द, इत्. ३१९)

ऌ अल् ० कल्पित (कृप् याचापर्यवसित कृप् इत् ११५)

ए ए ऐ माइक (मे, इक)

ऐ ० ऐ गायक (गै, अक)

ओ ओ औ दाव (दो, अ)

औ ० औः ग्लाव (ग्लौ, अ)

ए ऐ ओ औ यांस अनुक्रमानें अय्, आय्, अव्, आव्. हे आदेश स्वर पुढें असतां होतात.

---

उपसर्ग आणि धातू यांमध्यें, व, धातू आणि प्रत्यय यांमध्यें संधि होऊन, दोन स्वर मिळून एक किंवा दोन, स्वर अथवा अक्षरें होतात. त्याचे प्रकार समजण्याकरितां पुढें कोष्टक लिहितों.

हे स्वर पुढें असतां संधी होतात त्या.

| | अ | आ | इ | ई | उ | ऊ | ऋ | ॠ | ऌ | ए | ऐ | ओ | औ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ आ | आ | आ | ए | ए | ओ | ओ | अर् आर् | अर् आर् | अल् आल् | ऐ | ऐ | औ | औ |
| इ ई | य | या | ई | ई | यु | यू | यृ | यॄ | यॢ | ये | यै | यो | यौ |
| उ ऊ | व | वा | वि | वी | ऊ | ऊ | वृ | वॄ | वॢ | वे | वै | वो | वौ |
| ऋ ॠ | र | रा | रि | री | रु | रू | ॠ | ॠ | लृ | रे | रै | रो | रौ |
| ऌ | ल | ला | लि | ली | लु | लू | ० | ० | ० | ले | लै | लो | लौ |
| ए | अय | अया | अयि | अयी | अयु | अयू | अयृ | अयॄ | अयॢ | अये | अयै | अयो | अयौ |
| ऐ | आय | आया | आयि | आयी | आयु | आयू | आयृ | आयॄ | आयॢ | आये | आयै | आयो | आयौ |
| ओ | अव | अवा | अवि | अवी | अवु | अवू | अवृ | अवॄ | अवॢ | अवे | अवै | अवो | अवौ |
| औ | आव | आवा | आवि | आवी | आवु | आवू | आवृ | आवॄ | आवॢ | आवे | आवै | आवो | आवौ |

संधींतील पूर्व स्वर.

यांत अ कारापुढें ॐ कार आला असतां अ कारास पररूप होतें. उ० शिवाय ॐ नमः शिवायोनमः ) आ याच्यापुढें अ,आ आले असतां, दोहोंच्या ठिकाणीं आ होतो. अ,आ यांच्यापुढें इ,ई, आले असतां, दोहोंच्या ठिकाणीं ए होतो. पदांतीं ए किंवा ओ कार असून पुढें अ कार असल्यास अकारास पूर्वरूप होतें. उदाह०

हरेव. (हरे अव.) विष्णोव (विष्णो अव) हेविष्णोरक्षणकर इत्यादि साधारण नियम समजावे. वरील नियमांस क्वचित् अंतर पडतें तें संस्कृत व्याकरणाच्या पूर्ण अभ्यासा शिवाय कळणार नाहीं. व्यंजनाच्या संधीविषयीं मुख्य मुख्य नियम आहेत. ते १ स्थलविशेषीं क्, च्, ट्, त्, प्, यांस अनुक्रमें ग्, ज्, ड्, द्, ब्, हे होतात. उ० १ (ऋक्, वेद) ऋग्वेद. २ (ऋच्, घोष) ऋजघोष. ३ (षट्, आनन) षडानन. ४ (सत् आनंद) सदानंद ५ (अप् ज) अब्ज. २ स्, न्, यांस अनुक्रमें ष्, ण् हे होतात. उ० १ (दुस् काल) दुष्काळ. २ (प्रकीर् न) प्रकीर्ण ३ श् यास ङ्, ञ्, ण्, न्, म्, य्, र्, ल्, व्, यांवांचून कोणतेंही व्यंजन पुढें असतां ष् होतो. उ० १ (स्पश् न) स्पष्ट ४ त्, थ्, द्, ध्, न्, स्, यांस यांच्या मागें किंवा पुढें ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, स् हे आले असतां अनुक्रमानें ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, ष्, हे होतात उ० (कृष्, त) कष्ट इत्यादि. ५ त्, थ्, द्, ध्, न्, स्, यांस यांच्या मागें किंवा पुढें च्, छ्, ज्, झ्, ञ्, श्, हे असतां अनुक्रमानें च्, छ्, ज्, झ्, ञ्, श्, हे होतात. उ० १ (सत्, चिदानंद) सच्चिदानंद. २ उज्जिवन इत्यादि. ६ स्थलविशेषीं च्, ज्, यांस अनुक्रमें क्, ग्, होतात उ० १ (संपृच्, त) संपृक्त. २ (रंज् अ) रंग त्, द, यांस न् पुढें असतां न् होतो उ० १ (उन् नत) उन्नत. २ (छीद न) छिन्न इत्यादि. ७ अनुस्वराचा उच्चार, त्याच्या पुढें क्, च्, ट्, त्, प्, या वर्गां पैकीं कोणतेंही व्यंजन पुढें आलें असतां ज्यावर्गांतील तें व्यंजन असेल त्या वर्गाचे अंत्य व्यंजना प्रमाणें होतो. उ० १

१(सं, कल्प) संङ्कल्प इ० ८ अनुस्वराचा उच्चार त्याच्या पुढें य्, ल्, व्, हे आले असतां, अनुक्रमानें य्, ल्, व्, यां सारिखा होतो. उ० १ (सं लाप) सल्लाप इत्यादि. ९ कित्येक ठिकाणी विसर्गाचा उच्चार पुढील वर्णाच्या योगानें श्, ष्, स्, यांच्या सारिखा होतो उ० १ (निः शेष) निश्शेष २ (निः कलंक) निष्कलंक ३ (नमः कार) नमस्कार इत्यादि.

ह् कार पदांतीं असतां त्यापुढें कोणतेंही व्यंजन आल्यास ह् कारास ढ कार होतो उ० मधुलिट् (भुंगा) मधुलिह्-क्विप्)

र किंवा ढ. यापुढें क्रमाने हेच वर्ण येतील तर पूर्व वर्णाचा लोप होतो. आणि त्यापूर्वी अ, इ, उ, यांतून कोणताही वर्ण असेल तर त्यास दीर्घत्व येतें उ० (पुनर् रमते) पुनरमते पुनारमते (पुनः रमतो) हरिर् रम्यः हरिरम्यः हरीरम्यः (हरी सुंदर) शंभुर् राजते. शंभु राजते. शंभूराजते. (शंकर शोभतो) लिढ्-ढः लीढः (चाटलेला) इत्यादि. यावर्णांतून कोणही नसल्यास लोप मात्र होतो दीर्घ होत नाहीं जसें वृढ् ढः वृढः (मोरडेला)

---

**धातूंचा लिहिल्या अर्थाहून कांहीं धातूंचे अधिकही अर्थ आहेत परंतु ज्या अर्थांचा उपयोग उदाहरणांत केला आहे ते सामान्य अर्थमात्र येथें लिहिले आहेत.**

# शब्दसिद्धि निबंध.

## अ.

१ अक्. (इ) खूण, चिन्हकरणें. भू०वि० १ अंकित वि० २ निरंक (अंकर हित) ३ सा क. ना० ४ पर्यंक (पलंग) ५ अंकुर ६ अंक (मांडी व अंक) भा० ७ अंकन (चिन्ह करितां येतें जाणें)

२ अग्. (अ) वांकडें चालणें. ना० १ अग्रं (शेंडीचें शेवट) वि० २ अग्र्य (पूज्य) ३ अग्रिय (प्रथम झालें तें) वि० ४ व्यग्र: (व्याकुल:)

३ अग्. (इ) जाणें वि० १ निरंग. २ दुरंग. ३ व्यंग. ४ अव्यंग. ५ स्वंग. ६ प्रत्यंग. ७ उपांग (गौण अंग) ८ सांग ना० ९ अंग. १० अंगना (स्त्री) ११ अंगण (आंगणे) १२ अपांग (नेत्रकटाक्ष) १३ अंतरंग १४ बहिरंग. १५ तरंग. १६ मृदंग. १७ जलतरंग १८ अग्नि: (अंगते गच्छतीति)

४ अघ्. (इ) जाणें ना० १ अघ (पाप व दु:ख) २ अघमर्षण (तीर्थ) वि० अघवान् (पापी)

५ अंच्. (उ) जाणे व पूजाकरणे. (आञ्च्, आक् आङ्, इच्) वि० १ अर्वाचीन (आलीकडील) २ अर्वाक् (आलीकडे) ३ अर्वाक् (खाली) ४ तिर्यक् (आडवें) ५ प्राचीन ६ प्रांच् (प्राचीन) ७ पराङ्मुख. ८ प्राङ्मुख (पूर्वेस तोंड आहे ज्याचें) ९ प्रत्यङ्मुख (पश्चिमेस मुख आहे ज्याचें) १० उदङ्मुख (उत्तरेस मुख आहे ज्याचें).

ना० ११ अंचल (आंकळी) १२ प्राची १३ प्रतीची १४ उदीची प्र०

वि० १५ अंचितः (पूजिलेला)

६ अज् (अ) जाणें ना० १ अजा (शेळी) २ अज (बकरा) ३ व्यजन (विंजणा) वि० ४ अक्तः (गेलेला)

७ अंज् (ऊ) स्पष्ट करणें, जाणें, मारवणें. (अंग) ना० १ अभ्यंग (सर्वांगास तेल लावणे) २ अंजन (डोळ्यांत घालावयाचें काजळादीक) वि० ३ अभिव्यंजक. (सूचक) ४ व्यंजक (सूचक) ५ अभिव्यक्त-(स्पष्ट) ६ व्यक्त. ७ अव्यक्त वि० अक्तः (अभ्यंग केलेला किंवा अंजन केलेला डोळा इत्यादि.) ना० ९ अभिव्यक्तिः १० अंजलि ११ व्यंजन. (स्वररहित मुळाक्षर, अनुस्वार, चटनी, भाजी. इत्यादि) १२ व्यक्ति (भिन्नपणा)

८ अट् (अ) हिंडणें. ना० १ अटन (हिंडणें) २ अटवी (अरण्य) ३ अटनिः (धनुष्याची प्रसंचा) वि० ४ पर्यटित (फिरलेला)

९ अट्ट (अ) अतिक्रमिणें. ना० १ अट्ट (माडी)

१० अण् (अ) वांचणें. वि० १ निःप्राण ना० २ प्राण (हृदयस्थ वायु) ३ प्राणी. ४ प्राणन. (जीवन) ५ अणकः (वाईट बोलणारा) ६ अणु-मा० ८ प्राणन (जगणें.)

१२ अत् (अ) सर्वदा संचार करणें. ना० १ पदातिः (पायानी संचार करितो तो (प्यादा) (पायदळ) २ आत्मा. ३ अतिथि. (पाहुणा) ४ आ-

तिथ्य (पाहुणेचार) ५अध्यात्म (वेदांत) ६परात्मा.

१२अत्. (इ) बांधणें. ना० १अंत. २मांत ३अंतर वि. ४अंनक (अंतानेंक रितीजो तो मृत्यु) ५अंतिम. (शेवटचा) ६अंत्य. ७अत्यंत. ८उपांत्य. (अंत्याच्या मागचा)

१३अद् (अ) भक्षणें. वि० १अद्य (भक्षितात जें) २कदन्न (वाईट अन्न) ना० ३अन्न (खाण्यास योग्य जें) भा० ४अदन (खाणें)

१४अंध डोळे फुटणें वि० १अंध. २अंधक. ना० ३अंधकार. अंधकरिपु (महादेव) ४अंधस् (अन्न) ५अंधु (कूप) ६आंध्य (आंधळेपणा.)

१५अन्. (अ) वांचणें ना० १अपान (गुद. गुदस्थवायू.) २समान (समान शरीर मध्यनाभी तेथें राहातो.) ३उदान (कंठस्थवायु) ४व्यान सर्वशरीरस्थ वायु.)

१६अब्. (इ) शब्द करणें. गमन करणें. ना० १अंबा (माता) २अंबु (उदक) ३अंबर (अंबरम्०शब्द, त्यातें घेतें तें. आकाश.) वि० ४अंबित. (शब्दित.)

१७अभ्र्. (अ.) जाणें. वि० १निरभ्र २अभ्रिय (मेघापासून होतें तें) ना० २अभ्र (मेघ व आकाश)

१८अम्. (अ.) रोग होणें. वि० १आम (कोवळें फळ इत्यादि.

१९अय्. (अ.) जाणें. ना० १आयुष्य. २अत्यय. ३अयन. (मार्ग व ऋतु.)

४अयस्(लोखंड.) ५उदगयन ६दक्षिणायन.

२०अर्घ्. (अ)किंमत पडणें. व०१पूजा.ना०२महर्घता. अर्घ.(पूजाद्रव्य व मोल)वि०३अर्घ्य(पूज्य)

२१अर्च्. (अ)पूजाकरणें. भू०वि०१अर्चित.(पूजाकेलेला) वि०२अर्च्य(पूज्य) ३अर्चक.(पूजक) ना०४अर्चा. अर्चि(पूजिजे तेजीति ज्वाला अग्नीची) ५अर्क:(सूर्य) भा०५अर्चन.(पूजन)

२२अर्ज्. (अ)आर्जव. संपादन करणें भू०वि०१अर्जित. २उपार्जित. ना०३स्वर्ग:(चांगला संपादन करितात तो.)४आर्जव. भा०५अर्जन. ६उपार्जन.उपार्जना.

२३अर्थ्(अ) मागणे. भू०वि०१अर्थित. २समर्थित ३अनर्थित वि०४समर्थ. ५अन्वर्थ.(यथार्थ) ६निरर्थक. ७व्यर्थ. ८अर्थी. ९प्रार्थक(मागणारा)ना०१०अर्थ. ११अनर्थ. १२प्रार्थना. भा०१३समर्थन(प्रतिपादन)

२४ अर्ह्.(अ)पूजाकरणें, योग्यहोणें. वि०१अर्ह.(योग्य) ना०२अर्हा.(योग्यता पूजा) ३अर्हित:(पूजिलेला)

२५अल्.(अं) शोभवणें, पूर्णकरणें. वि०१अलंकरिष्णु. अलं कर्मीण:(कर्म करण्यास समर्थ.)२अलंकृत. ३अलंकार्य. ना०४अलक.(केश).५अलंक्रिया.(अलंकार.) भा०६अलंकरण. ७अलं.

२६अव्.(अ) रक्षण करणें.(आणखी) १८ अर्थ आहेत.) ना०१अवनी

(पृथ्वी) २अवमः (हिंसाव याचना करणारा.) भा० २अवन (रक्ष
ण) भू० ३अवितः (रक्षिला.)

२७अश्.(अ.) खाणें, जेवणें. भू० १अशित (खाल्लेलें) २प्राशित. (प्यालेलें)
भा० ३अशन. खाणें. ४प्राशन (पिणें) ५निरशन. (उपास) नाम
६अशनाया (भूक) ७अशनि. (वज्र) वि० ८ अशनायित (भुके
ला)

२८अंश्.(अ) वांटणें. वि० १अंशी (वांटेदार) २निरंशी (ज्यास वांटा नाहीं
तो) ना० ३अंश. (वांटा.) ४ अंशु (किरण) ५ अंशुमान् ६अंशुक
(वस्त्र) भू० अंशितः (वांटलेला)

२९अंशू व्याप्त्यर्थी. नाम. १अक्षोट. (अक्रोडवृक्ष) २अक्षि (डोळा) ३अ
क्षिगत. (शत्रू) ४अश्रु (नेत्रोदक)

३०अस्.(अ) असणें. वि० १आस्तिक ना० २सत्ता. ३सती (पतिव्रता)
४सत्व (असणें.) ४ सत् (असणारें चांगलें) ५असत्.
(मिथ्या) भा० अस्तित्व.

३१अस् (उ) फेंकणें. भू० १निरस्त (त्यक्त) २परास्त. ३पर्यस्त. ना० ४ अस्त्र
(फेंकावयाचें) ५अस्त ६व्यसन ७असि (तलवार) ८असुर (दै
त्य) ९व्यास (विस्तार) १० प्रास्यतेइतिप्रास. (भाला)

३२अक्ष्.(उ.) व्यापणें, जमाव होणें ना० १अक्ष. (फांसा) २अक्षिवं (मीठ)
वि० २अक्षवती (क्रीडा)

३३आंदोल. झोंका देणें ना०१आंदोलक.(घड्याळांत टांगलेलें झोंका घे णारें वजन) वि०२आंदोलित:(झोंका दिलेला) भा०३आंदोल न (झोंपा घेणें.)

३४आप् (लृ) व्यापणें भू०१आप्लुत:(व्याप्त:) २अव्याप्त. वि०३व्याप्य. ४व्यापक.५व्यापी. ना०६अप् ७व्याप्ति.८अव्याप्ति भा०९व्या पन.

३५आप्. (लृ) प्राप्त होणें.भू०१प्राप्त.२समाप्त.३अवाप्त.(प्राप्त झालेलें) वि०४आप्य .५प्राप्य (मिळावयाजोगें) ६समाप्य (संपवाया जोगें) आप्यायन (संतुष्ट करणें) ना०६आप्त (यथार्थ वक्ता) ८प्राप्ति.९समाप्ति.१०आप्ति.भा०११समापन.(समाप्त करणें.)

३६आस्.(अ) बसणें.ना०१आसन.२आसना.(राहाणें) ३आस्य (मुख)

इ.

३७ इ } (ण्) } जाणे.(अय्,आय्)१अन्वित.(संबंध.) २अतीत वि०
३८ इ. ३विपरीत. ना०४समय.(वेळा) ५अन्वय ६आय (प्रा प्ती) ७व्यय.(खर्च) ८उदय.(प्रादुर्भाव) ९प्रत्यय.१०पर्याय ११अव्यय.(ज्याचा नाश नाहीं तो.) १२सहाय.१३उपाय.१४अभ्यु दय.(दैववृध्दि) १५विपर्यय.(विरुध्द) १६अपाय.१७प्रेत. १८निरय.(वाईट स्थान)

३९ इ. (ङ्) अध्ययन करणें.(याचा प्रयोग, अधि, हा उपसर्ग लागून-

न होतो.) (अय् आय्) भू० १अधीत. (पडलेला, पढलेलें) २अनधीत.

वि० ३अध्येता (पढणारा) ४अध्याप्य (पढावयास योग्य जो) ना०

५अध्याय. ६अध्यापक (गुरु) ७उपाध्याय (अढविणारा) ८स्वाध्या

य (पढावयाचा दिवस.) ९अनध्याय भा० १०अध्ययन (पढणें.)

११अध्यापन (पढविणें.

४०इग्. (इ) जाणें ना० १इंगित वि० २इम (जंगमजीव.)

४१इद्. (इ) मोटें ऐश्वर्य पावणें ना० १इंद्र. २इंदीवर. ३इंद्राणी. ४इंदिरा.

(लक्ष्मी) वि० ५इंदित: (ऐश्वर्य पावला)

४२(ञि) इंधू. (ई) पेटणें ना० १समिध. (समिधा) २इंधन. (लांकूड गोंवरा

इत्या०) ३समिधा. आग्नीध्र (ऋत्विक्विशेष.) वि० ४इंधित: (पे

टविलेला.)

४३इर् (अ) जाणें. भू० १प्रेरित (पाठविलेला) वि० २प्रेरक. ना० ३इरण

(निराश्रयदेश) भा० ४प्रेरणा ५प्रेरण.

४४इल् (अ) ना० १एला (वेलची) २एलापर्णी (कोलिंजन) ३एडक (मेंढा)

४५इष् (अ) जाणें. इच्छाकरणें. भू० १प्रेषित (पाठविलेला) २इच्छित वि०

३इष्ट. ४अविष्ट. ५प्रेषक (पाठविणारा) ६प्रेष्य (सेवक) ना० ७इ

च्छा. ८प्रेष. भा० ९प्रेषण. १० अन्वेषण (शोधन करणें)

४६ईक्ष् (अ) पाहणें. भू० १परीक्षित. (परीक्षा केलेला) वि० २अपेक्षणीय

३उपेक्षणीय (दुर्लक्ष करायाजोगें.) ४अनुपेक्षणीय. ५परीक्षक.

६प्रेक्षक (विचारी) ना० ७ प्रेक्षा (विचार) ८प्रतीक्षा ९परीक्षा १० उपेक्षा (हयगई) ११अपेक्षा (गरज) १२ उत्प्रेक्षा (शंका) भा० १३समीक्षण (विचार) १४ ईक्षण १५परीक्षण १६अवेक्षण (पाहाणें) १७निरीक्षण १८प्रतीक्षण (वाटपाहाणें) १९संवीक्षण (शोध)

४७ ईर् (अ) जाणें. कांपणें. ना० १समीर. समीरण (वायु.) वि० प्रेरित:

४८ ईर्ष्य् (अ) ईर्ष्याकरणें ना० १ ईर्षा. २ईर्ष्या. वि० ईर्षित:

४९ ईश् (अ) पाहिजे तें करण्याची शक्ति असणें वि० १निरीश. २ईशित (नियमित) ना० ३ईश. ४अधीश ५ ईश्वर ६ ऐश्वर्य.

५० उष् (अ) दाह करणें वि० १उष्ण ना० ऊष्मा (उन्हाळा) उषण (मिरें)

५१ ऊष् रोगार्थ. १ ऊष: (खारीमाती) २ऊषर (खाजण)

५२ उषस् प्रभात काळ होणें ना० १उष:काल. २प्रत्यूष (प्रात:काल)

५३ उक्ष् (अ) शिंपणें. भू० १प्रोक्षित. भा० २प्रोक्षण.

५४ उच् (अ) संबधार्थ ना० १उग्रगंधा (वेखंड व ओंवा) वि० २उग्र (रागीट)

५५ ऊन् कमी करणें भू० १ऊनित (कमी केलेलें) वि० २ऊन. ३ न्यून.

५६ ऊर्ज् (अ) बळकट होणें. भू० १ऊर्जित. ना० २ऊर्ज: (कार्तिकमास) वि० ३ऊर्जस्वी. ४ऊर्जस्वल. (तेजस्वी)

५७ ऊर्णु (अ) आच्छादणें. ना० १ऊर्णा (लोकर) २ऊर्णनाभि (कोळी वसापासून उत्पन्न जो तंतू तो.) ३ऊर्णायु. (मेंढा)

५८ ऊह् (अ) कल्पना करणें वि० १दुरूह. (विचार करावयास कठिण) ना०

६० ऋण्. (अ) रिणकोहोणें वि० १ ऋणी. २ अनृणी ना० ३ ऋण.

६१ ऋछ. गमनार्थक ना० १ अर्णः (उदक) २ अर्णव (समुद्र) ३ अर्श (मुळव्याध) ४ अर्शोघ्न (सूरण)

६२ ऋज् (अ) मिळविणें. भू० १ अर्जित २ उपार्जित भा० ३ अर्जन वि० (अर्जक)

६३ ऋज् (ऊ) सरळ होणें. वि० १ आर्जवी. भू० २ आर्जवितः (आर्जविलेला) ना० ३ आर्जव (सरळपणा.)

६४ ऋधू (उ) वाढणें भू० १ समृध्ध (वाढलेलें) ना० २ समृध्धि. ३ ऋद्दि ४ अर्ध वि० ४ समृद्धितः (वाढलेला)

६५ ऋषू. (इ) जाणें ना० १ ऋषि वि० २ आर्ष (ऋषिप्रणीत आणि अव्यवस्थित.) ३ आर्षित.

६६ एला. विलास भोगणें. भा० १ ऐलन (क्रीडन) वि० २ ऐलितः (क्रीडाकेलेला.)

## क.

६७ कक् (अ-इ.) चपळपणा करणें ना० १ काक (कावळा) २ काकोदर (सर्प) ३ काकोल (डोमकावळा) ४ काकु (ध्वनिविशेष)

६८ कक्. (इ) जाणें ना० १ कंक. (पक्षी) २ विकंकत (वृक्षविशेष)

६९ कच् (अ) बांधणें, प्रकाशणें भू० १ विकच (प्रफुल्लित) ना० २ कच (कैंसकचनामदैत्य) ३ कंचुक (आंगरखा) ४ कंचुकी (चोपदार)

७० कच्. (इ) प्रकाशणें. वि० १ अकिंचन (ज्यापाशीं कांहीं एक नाहीं तो.) ना० २ कंचन (सोनें)

७१ कट् (ए) आवरण घालणे ना० १ कट. कटक (सैन्य) (फौज) २ कटी (कमर) वि० ३ कटु (निरवट) ४ उत्कट (माजलेला) ५ कटक (कडें) संकट.

७२ कट्. (इ) जाणें वि० १ निष्कंटक ना० २ कंटक. कंटकारिका (रिंगणी) ३ कंटकीफल (फणस)

७३ कट् (ई) जाणें भू० १ प्रकटित वि० २ प्रकट (प्रसिद्ध) ३ विकट (भयंकर) ४ निकट (फारजवळ)

७४ कड्. (इ) भेद करणें फोडणें ना० १ कंडनी (मुसळ) भा० २ कंडन (कांडणें) वि० ३ कंडित: (कांडलेला) ४ कंडोल (पाटी)

७५ कंडू (अ) खाजवणें ना० १ कंडू. कंडूरा (कुपली)

७६ कण्. (अ) जाणें. ना० १ कण. कणा (पिंपळी वजीरें) २ कणिश (धान्याचें लोंबर)

७७ कण्. (अ) एकडोळा असणें. वि० १ काण (एकाक्ष) यावरून माकृत काणा.

७८ कथ. व्याख्यान, देणें, करणें भू० १ कथित (सांगितलेलें) वि० २ कथनीय ३ कथक ना० ४ कथानक. ५ कथा भा० ६ कथन.

७९ कद्. (इ) विकलनाकरणें ना० १ कंद. २ कंदरा (गुहा) (कांदा) भा० २ कंदन.

८० कद्. (अ) विकलनाकरणे. भा० १ कदन (मारणें)

८१ कन्. (अ) शोभणें. ना० १ कनक. २ कन्या. ३ कानन. कनकालुका (सोन्याची झारी.)

८२ कंप्. (इ) कांपणें. भू० १कंपित २अनुकंपित. वि० ३कंपायमान. ४अनुकंपनीय. (दयेस योग्य) ना० ५कपि. ६अनुकंपा (दया) ७कंप भा० ७कंपन.

८३ कम्. (उ.) इच्छाकरणें. शोभणें वि० १काम्य २कमनीय (सुंदर) ३कांत. (सुंदर) ४निष्काम ५सकाम ६प्रकाम (अतिशयित) ७कामुक ना० ८कांत ९कांता १०काम ११कामना १२कांति.

८४ कर्ज् (अ) व्यथादेणें ना० १कर्ज वि० २कर्जन (दुःखदेणें)

८५ कृत् (इ) कापणें भू० १कर्तित ना० २विकर्तन (सूर्य) ३कर्तरी (कात्री) भा० .४ कर्तन. (कापणें)

८६ कल् (अ) शब्द करणें वि० १कल (अस्पष्ट आणि मधुर असा जो शब्द तो) ना० २कलकल ३कलह.

८७ कल्. जाणें गणणें भू० १आकलित वि० २अकाल ना० ३काल. ४कल्याण. ५अकल्याण. ६काळ (कलयति आयुः) ७कला (अंश) ८कलाद (सोनार) भा० ९आकलन.

८८ कल्. (अ) क्षिप्तकरणें. वि० १विकल. (खेदयुक्त) भा० २विकलन- (छिन्न भिन्न करणें) ना० ३कंकाल (हाड)

८९ कष् (अ) हिंसाकरणें. घांसणें. ना० १कष (कसोटी) २कष्ट ३कषाय- ४कूलंकषा (नदी) ५कच्छ (खरूज)

९० कस् (अ) जाणें भू० १निष्कासित (बाहेर काढलेलें) वि० २विकसित (फुलेला) वि० ३निष्कासनीय (बाहेर काढण्यास योग्य) ४निष्कास्य ५निष्कास

क. ना० ६विकास भा० ७निष्कासन. ८विकसन (प्रफुल्लित होणें)

९१ काचृ. (इ) प्रकाशणें. वि० १अकांचन ना० २कांचन (सोनें) ३कांची (कमरपट्टा) (क्षेत्र विशेष) काच (कांच)

९२काश्. (क्र) प्रकाशणें भू० १प्रकाशित २अप्रकाशित. वि० ३प्रकाशक. ४प्रकाश्य ५प्रकाश्यमान. ६संकाश. (समान) ना० ७काशी. ८प्रकाश. ९अवकाश. १०आकाश. भा० ११प्रकाशन.

९३कास् (क्र) वाईट शब्द करणें. ना० १कास (खोंकला) भा० २कसनं- (खों कणें) वि० ३कासित: (खोंकलेला)

९४ कांक्ष् (इ) इच्छा आणि संदेह करणें. भू० १कांक्षित (इच्छित) वि० २साकांक्ष. ३निराकांक्ष. ना० ४ कांक्षा (शंका) ५आकांक्षा (शंका)

९५कित्. (अ) राहाणें रोग दूर होणें. भू० १चिकित्सित वि० २चिकित्स्य. ३चिकित्सनीय. ४दुश्चिकित्स्य. ना० ५चिकित्सा. ६चिकित्सक (वैद्य) ७संकेत. भा० ८निकेतन. (गृह)

९६कील्. (अ) खिळविणें ना० १कील. कीलक. (खिळा पाचर) वि० २कीलित (बांधलेला.)

९७कु. (ड.) शब्दरचना करणें ना० १कवि. २कविता ३काव्य भा० ४कवन. ५कवित्त.

९८कुच. (अ) संकोच पावणें भू० १सकुचित. वि० २संकोची. ३संकोचनीय. ४संकोचक ना० ५कुच (स्तन) ६संकोच. भा० ७आकुंचन.

९९ कुंच् (अ) संकोच पावणें. भू० १ आकुंचित भा० २ आकुंचन. यावरून प्राकृत कुंचा हा शब्द आहे.

१०० कुट् (अ) वांकडा होणें वि० १ कुटिल. कुटिलकः यावरून प्राकृत कुटाळ

१०१ कुटुंब् (अ) एकत्र राहाणें वि० १ कुटुंबी. कुटुंबिन. ना० २ कुटुंब.

१०२ कुट्ट् (अ) वाईट काम करणें ना० १ कुट्टनी (कुंटणी) भा० २ कुट्टनं.

१०३ कुट्ट् (अ) कुटणें भू० १ कुट्टित (कुटलेलें) भा० २ कुट्टन. (कुटणें)

१०४ कुठ् (इ) कुंठित करणें भू० १ कुंठित. २ अकुंठित. वि० ३ अकुंठ भा० ४ कुंठन. ना० ५ वैकुंठ (लोक व विष्णू)

१०५ कुड् (इ) जाळणें. रक्षणें ना० १ कुंड (होमाचें कुंड किंवा जारापासून झालेला.) २ कुंडी (जलपात्र)

१०६ कुत्स् (अ) दोष लावणें, निरस्कार करणें. भू० १ कुत्सित. ना० २ कुत्सा. भा० ३ कुत्सन.

१०७ कुथ् (इ) क्लेश भोगणें. ना० १ कुथ. २ कुथा (हत्तीची झुरखन.) भा० ३ कुंथन. यापासून प्राकृत कुंथणें.

१०८ कुप् (अ) कोपणें भू० १ कुपित वि० २ कोपी. ना० ३ कोप. ४ प्रकोप. ५ विकोप. भा० ६ कोपन.

१०९ कुमार. खेळणें ना० १ कुमारकः (बालक) २ कुमारिका.

११० कुल् (अ) संबंध करणें. भू० १ आकुलित. (घाबरलेला) वि० २ आकुल. ३ व्याकुळ ४ संकुल (मिसळलेलें.) ५ कुलिन ना० ६ कुल (वंश.)

१११ कुश्. (अ.) संश्लेषार्थ ना० कोश (भांडारगृह, शब्दकोश, कोशेय, कमळ वागाभा, तरवारीचें मेण) कोशफळ (कंकोळ)

११२ कूज्. (अ.) अव्यक्त शब्द करणें ना०१ कूजित (पक्ष्यादिकांचें ओरडणें) भा० कूजनं.

११३ कूट् (अ) नसमजण्यासारिखें करणें इत्यादि. ना०१ कूट (पर्वताचें शिखर, कपट, असत्य,)

११४ कूळ्. (अ.) आवरणें. वि०१ अनुकूल ना० २ कूल.

११५ (डु.) कृ. (अ) करणें (कर, कार) भू०१ प्रकृत २ कृत. ३ अपकृत. ४ संस्कृत. ५ विकृत. ६ अधिकृत. (आरंभित) ७ परिष्कृत. ८ उपस्कृत. ९ अंगीकृत १० आविष्कृत. ११ चिकीर्षित. १२ सत्कृत. १३ स्वीकृत. वि०१४ करिष्णु १५ कृत्रिम १६ कर्तव्य १७ क्रियमाण १८ अपकारक. १९ अपकारिष्णु २० अपकर्तव्य. २१ अपकार्य. २२ संस्कार्य. २३ सुकर. २४ उपकार्य २५ उपकारक. २६ अंगीकार्य २७ चिकीर्षु. २८ दुष्कर २९ स्वीकार्य ३० अकर्मक ३१ सकर्मक ३२ अकार्य ३३ अनुकारक ३४ संस्कारी. ना० ३५ कर्ता ३६ कारक ३७ कर्म ३८ अकर्म ३९ कार्य ४० करण ४१ क्रिया ४२ कृति ४३ प्रकार. ४४ प्रक्रिया ४५ प्रकृति ४६ अपकार. ४७ अपक्रिया ४८ अपकृति ४९ संस्कार ५० विकृति ५१ आकार ५२ अधिकार ५३ सुकृत (पुण्य) ५४ प्रतिकार ५५ प्रतिकृति ५६ परिष्कार. ५७ उपकर्ता. ५८ उपकार ५९ आकृति ६० अहंकृति ६१ अहंकार ६२ अंगीकार ६३ चिकीर्षा ६४ दुष्कर्म.

७६ अनुक्रिया ७७ अनुकरण ७८ व्याकरण ७९ कृत्य ८० आविष्करण. ८१ उपकरण ८२ प्रकरण ८३ कारण ८४ अधिकरण ८५ कृति ८६ क्रिया ८७ अपकरण. ८८ कारणा (नरकपीडा) ८९ कारणिक (परीक्षक)

११५ कृप्. (ऊ) शक्तिमान होणें भू० १ कल्पित. २ अकल्पित वि० ३ कल्पक ४ काल्पनिक. ५ कल्प (समर्थ) ना० ६ कल्पना ७ कृपि. ८ अकल्प ९ विकल्प १० संकल्प

११६ कृप्. दुर्बल होणें दया करणें भू० १ कृपण २ कृपालु ना० ३ कृपा ४ कृपाण (तलवार)

११७ कृश्. (अ) सूक्ष्म करणें भू० १ कर्शित वि० २ कृश. ना० ३ कार्श्य (रोडकेपणा) ४ कृशानु (अग्निः) ५ कृशाश्वित् (नाचणा रांच्या)

११८ कृष् (अ) विलेखनार्थ भू० १ आकर्षित. २ कर्षित ३ आकृष्ट ४ अपकृष्ट. ५ निकृष्ट वि० ६ उत्कृष्ट ७ निकृष्ट ८ आकर्षक ना० ९ निष्कर्ष १० आकर्ष ११ अपकर्ष. १२ अनुकर्ष १३ उत्कर्ष १४ प्रकर्ष भा० १५ आकर्षण.

११९ कृष्. (इ) नांगरणें. ना० १ कृषि २ कृषीवल (शेतकारी) शेतकाम भा० कर्षः





१२० कृतृ. (अ) उत्तमप्रकारें बोलणें. भू० १कीर्तित. वि० २कीर्तिमान्
ना० ३कीर्ति ४अपकीर्ति ५दुष्कीर्ति ६सुकीर्ति भा० ७कीर्तन
८संकीर्तन.

१२१ कृ. उडविणें १कर्ण (कान) १कर्णिका (तानवड व कमळकोश)
भा० ३आकर्णन (ऐकणें) वि० ४ संकीर्ण (पसरलेलें किंवा मिश्रित.) ५ प्रकीर्ण.

१२२ केत. आमंत्रण करणें भू० १सांकेतित वि० सांकेतिक ना० ३संकेत.

१२३ कै. शब्द करणें ना० १काक २ढक्का (डंका नोबत)

१२४ क्रद्. (इ) बलावणें व रडणें. भू० १क्रंदित ना० २क्रंदन (रडणें) ३
आक्रंदन वि० ४ आक्रंदित: (ओरडलेला)

१२५ क्रम्. (उ) चालणें. भू० १संक्रमित २ उत्क्रांत (वर किंवा बाहेर चालले ला) ३निष्क्रांत (निघालेला) ४ आक्रांत ५ अतिक्रांत ६उपक्रांत (आरंभिलेलें) ७प्रक्रांत (प्राप्त) वि० ८ क्रमिक. ना० ९क्रम
१०प्रक्रम (व्यवहार) ११अपक्रम (वाईटरीति) १२अनुक्रम १३विक्रम. १४पराक्रम १५ चक्र (चाक) १६उपक्रम १७ व्युत्क्रम १८क्रांति १९ संक्रांति. २० अतिक्रम. भा० २१ क्रमण. इत्यादि-

१२६ (डु) क्री. (अ) विकत देणें- घेणें. भू० १विक्रीत २अक्रीत वि० ३क्रय्य (विकण्यास योग्य) ना० ४क्रय. ५विक्रय.

१२७ क्रीड्. (अ) क्रीडा करणें. भू० १क्रीडित. ना० २क्रीडा भा० ३क्रीडन.

१२९ क्रुश्. (अ) रडणें-ओरडणें. वि० १ क्रुष्ट ना० २ आक्रोश ३ क्रोश.

१३० क्लिश्. (अ) दुःख देणें-होणें भू० १ क्लिष्ट ना० २ क्लेश ३ अक्लेश.

१३१ क्लीब्. (ऋ) भित्रा, नेभळा असणें. ना० १ क्लीब (नपुंसक, भित्रा)

१३२ क्लु (ङ्) गत्यर्थ ना० १ क्लोम (कालीज फुफुस.)

१३३ क्वथ्. (९) कढविणें. भू० १ क्वथित ना० २ क्वाथ (काढा.)

## ख.

१३४ खड् (इ) तुकडे करणें. भू० १ खंडित २ अखंडित वि० ३ खंडनीय ४ खंड्य ५ अखंड ना० ६ खड्ग ७ खंड ८ आखंडलः (इंद्र) भा० ९ खंडन.

१३५ खद्. (अ) स्थिर असणें. ना० १ खदिर.

१३६ खन्. (उ) खणणें भू० १ खनित २ उत्खात (उपटलेला) वि० ३ खनिज ना० ४ खनि (खाण) ५ खात (खळी) भा० ६ खनन

प्राकृत, खांच, खळगा, खांचर.

१३७ खर्ज्. (अ) व्यथा देणें ना० १ खर्जू (खरूज) २ खर्जूरः (खजूर) भा० ३ खर्जन (खाजिवणें)





१३८ खाद्. (क) खाणें भू० १ खादित वि० २ खाद्य. ३ खादक.

१३९ खिद्. (अ) दुःखपावणें भू० १ खिन्न. २ खेदित वि० ३ सखेद ना० ४ खेद.

१४० ख्या. सांगणें भू० १ प्रख्यात. २ विख्यात ३ आख्यात ४ असंख्यात वि० ५ ख्यातिमान् ना० ६ ख्याति ७ संख्या ८ आख्या ९ आख्यायिका (कथा) १० आख्यान भा० ११ संख्यान.

## ग.

१४१ गज्. (अ) मदार्थक. ना० १ गज (हत्ती.)

१४२ गड्. (इ) तोंडाचा प्रदेश. १ गंड (गाल)

१४३ गण. मोजणें, गणणें भू० १ परिगणित २ अगणित वि० ३ गण्य ना० ४ गण (समुदाय) ५ गणक (ज्योतिषी) ६ गणना ७ गणित ८ अवगणना (अपमान) भा० ९ गणन (मोजणें)

१४४ गद् (अ) अव्यक्त शब्द. भू० १ गदित. ना० २ गद्य (फक्किका) गद्यतीति ३ गदा (आयुध) ४ गद (रोग) ५ अगद (निरोगी)

१४५ गद्गद. घाबरे पणानें किंवा दुःखानें आंखडत बोलणें. भू० गद्गदित वि० १ गद्गद २ सद्गद.

१४६ गंध्. (अ) चुरणें. घांसणें वि० १ सुगंधि ना० २ गंध ३ दुर्गंध ४ सुगंध ५ अतिगंध भा० ६ गंधन (सूचन)

१४७ गम्. (ल्ह) चालणें भू० १ अभ्यागत. २ अपगत ३ अधिगत ४ अ

. ५अवगत. ६उद्गत. ७ संगत. ८गत. ९आगत. १०निर्गत. ११
. वि० १२गम्य. १३ अगम्य. १४ अधिगम्य. १५अनुगामी. १६स्र
१७दुर्गम. १८ जंगम. १९ आगामी २०स्रसंगत. २१ विसंगत
ता. ना० २३गमन. २४ संगति. २५स्रसंगति २६दुर्गति. २७स
. २८ गति. २९ अवगम. ३० अभ्युपगम. ३१अधिगम ३२अ
म. ३३गंगा ३४अवगति. ३५ संगम. ३६ स्वागत. ३७ आगम.
निगम. ३९ निर्गम. ४० गात्र. ४१ गो. (गाय) ४२दुर्गम (किल्ला)
ामक (कारण, प्रमाण) प्राकृत अगत्य.

(अ) शब्दकरणें. भू० १गर्जित ना० २गर्जना वि० ३गर्जनू.

(अ) शब्दकरणें ना० १गर्दभ.

(अ) गर्वकरणें. भू० १गर्वित. वि० २गर्विष्ठ. ना० ३गर्व.

(अ) निंदाकरणें. भू० १गर्हित. २विगर्हित वि० ३गर्ह्य ४गर्हणी
निंद्य) ना० ५गर्हा. ६ गर्हणा. ७विगर्हणा (निंदा)

(अ) स्रवणें, स्राणें भू० १गलित २गालित (गाळलेलें) ३नि
त. (सारांश काढलेला) ना० ४ गल. (गळा) ५गल्ल (गाल) भा०
लन.

. (अ) धारिष्ट असणें भू० १प्रगल्भित वि० २प्रगल्भ (प्रौढ)

ष. शोधणें भू० १गवेषित (शोधिलें) ना० २गवेषणा (धर्म
बंधी शोध) यावरून मा० गवसणें.

१५५ गा. स्तुतिकरणें ना० १ गाथा. २ गान वि० ३ गीत. (स्तुतिकलेला)

१५६ गाधृ. (क) शोधकरणें. वि० १ अगाध. (अगम्य)

१५७ गाहू. (उ.) स्नानकरणें. भा० १ अवगाहन (बुडिमारणें) याचे धातूस ह्रस्व होऊन रूपें होतात. तेव्हां धातूचा अर्थ, अगम्य असणें असा होतो. वि० २ गहन. (जाण्यास कठिण.) ३ उद्गाढ (अतिशय) ना० ४ गहन (रान)

१५८ गुजू. (इ) अस्पष्टशब्दकरणें. ना० १ गुंजारव. २ गुंजा वि० ३ गुंजित. (शब्दित)

१५९ गुठू. (इ) गुंडाळणें भा० १ गुंठन (गुंडाळणें) वि० २ गुंठित (गुंडाळलेला)

१६० गुडू. (अ) रक्षणादि अर्थ. ना० १ गुड. (गूळ)

१६१ गुण् बोलावणें. मोजणें. वि० १ गुणि. २ गुण्य. ३ गुणक. ४ निर्गुण. ५ सगुण ना० ६ दुर्गुण ७ सद्गुण ८ गुणानिका भा० ९ गुणन.

१६२ गुपू. (अ) गुप्तराखणें. भू० १ गुप्त. २ गोपित. ३ गोपनीय. ४ गोप्य भा० ५ गोपन.

१६३ गुपू. (उ.) रक्षणें. वि० १ गोप्ता. २ गोपायिता, गुप्त. ना० २ गोप (गुरेंराखणारा) भा० ३ संगोपन.

१६४ गुफू. (अ) गुंफविणें. ना० १ गोफ. (गोप) २ गुफणा (गोफण)

१६५ गुंफू. (अ) गुंफणें भू० १ गुंफित. वि० गुंफक. ना० गुंफा. भा० गुंफन.

१६६गुहू.(ऊ) झांकणें भू०१ गूढ. २निगूढ. वि०३ गुह्यक ४ गुह्य ना०
५ गुहा. ६ गूढपात् (सर्प)

१६७गृह्.(ऊ) ग्रहण करणें भू० १गृहीत. २अनुगृहीत. ३ भगृहीत
वि०४गृह्य ५ग्राह्य ६गृही. ७ अनुग्राह्य ८अनुगृहीता ना०९
गृहिणी (गृहस्वामिणीस्त्री) १० गृह ११ गृहस्थ.

१६८गॄ. निगरण अर्थ. ना०१गिरि. २गुरु. ३उपगुरु ४उद्गार. ५गुर्वि-
णी. (गरोदर स्त्री) ६गीर्वाण(देव.) ७गी. (वांचा) ८ग्रीवा(मान) ९श्री
भक्तवु. भू०१गीर्ण (गिळिलेला)

१६९गै. शब्दकरणें ह्मणजे गाणें. (गा, गाय्) ना०१गायक. २गीति.
३ गीत. ४ गान. ५गायन.

१७०ग्रंथ्.(अ) बांधणें. संदर्भजुळवणें भू०१ग्रथित (बांधलेला) वि०
२ग्रथ्यमान. ना०३ग्रंथ. ४ ग्रंथि (गांठ) ५ ग्रंथकार भा०६ग्रथन.

१७१ग्रस्.(उ) भक्षण करणें भू०१ग्रसित. २ग्रस्त वि०३ग्रस्यमान ४ग्रा
सी. ना० ५ग्रास. ६ कग्रास.

१७२ग्रह्.(अ) स्वीकारणें भू०१भग्रहित. वि० २अनुग्राहक. ३आग्रही.
५ग्राहक. ६ निराग्रही ना० ७निग्रह. ८ दुराग्रह. ९ अनुग्रह. १०
परिग्रह. ११विग्रह १२ ग्रहण. यावरून प्राकृत गिन्हाइक.

१७३ग्राम. एकेठिकाणीं वास करणें. वीसावणें. वि०१ग्राम्य.
ना० २ ग्राम.

१७४ ग्लै-म्लै. हर्ष, धातूचा क्षय होणें. वि० १ग्लान. २म्लान. (गतहर्ष.) ना० ३ग्लानि.

## घ.

१७५ घट्. (अ) अनेक प्रकारचे उद्योग करणें. व संघात. भू० १अघटित. २घटित. ३उद्घाटित. वि० ४दुर्घट ५घटक. ६उद्घाटक. ना० ७घट ८घटिका ९घटना १०उद्घाट भा० ११उद्घाटन.

१७६ घट्. (इ) शब्द करणें ना० १घंटा. २घंटापथ (राजमार्ग.)

१७७ घस्. (लृ.) खाणें. ना० १घास (घांस, गवत)

१७८ घुर्. (अ) भयंकर शब्द करेणें. वि० १घोर (भयंकर) २अघोर. यावरून प्राकृत घोरणें घरघर.

१७९ घुष्. (इर) मोठ्यानें बोलणें. भू० १घुषित २घोषणा. वि० ३संघुष्ट. ना० ३घोष. ४निर्घोष.

१८० घृ. शिंपणें ना० १घृत. २अभिघार. भू० ३अभिघारित.

१८१ घृष्. (उ.) घांसणें भू० १घृष्ट. २घर्षित वि० ३घर्षिता ४घर्ष्य. भा० ५घर्षण. ६संघर्षण. ना० ७घृष्टि (डुकर.)

१८२ घ्रा. वास घेणें भू० १अवघ्रात. २आघ्रात. ना० ३घ्राण ४व्याघ्र भा० ५अवघ्राण. ६आघ्राण.

## च.

१८३ चक्. (अ.) दचकणें. भू० १चकित.

(झार)

१८६ चत्. (ए) याचना करणें वि० १ चतुर ना० २ चातुर्य.

१८७ चद्. (इ) संतोषपावणें ना० १ चंद्र. २ चंदन. ३ चंद्रिका (चांदणें)

१८८ चम्. (उ) भक्षणें वि० १ आचमनीय. ना० २ आचमन.

१८९ चर् (अ) चालणें. भू० १ आचरित. २ विचारित. वि० ३ विचारक. ४ दुराचारी. ५ विचारी ६ अविचारी ७ उच्चार्यमाण ८ अचर ९ विचारणीय १० उच्चार्य ११ अनुच्चार्य. १२ व्यभिचारा १३ अभिचारी १४ प्रचारी. १५ चरिष्णु (जाणारे) ना० १६ चर. १७ चरु (भात) १८ अनुचर (चाकर) १९ चरित्र २० आचार्य २१ चरण २२ आश्चर्य २३ प्रचार. २४ संचार २५ दुराचार २६ दुराचरण २७ आचार. २८ आचरण. २९ उपचार ३० परिचार. ३१ विचार ३२ विचारणा ३३ उच्चार ३४ चार (जासूद) ३५ अतिचर ३६ अतिचार ३७ अभिचार ३८ व्यभिचार. ३९ चर्या. भा० ४० उच्चारण यावरून प्राकृत आचारी.

१९० चर्च्. (अ) भाषण करणें. भू० १ चर्चित ना० २ चर्चा (वाद)

१९१ चल्. (अ) चालणें, कांपणें. भू० १ चलित. २ प्रचलित वि० ३ चंचल. ४ चल. ५ अचल. ६ निश्चल. ना० ७ चाळनी. (चोळण) ८ चालना. भा० ९ चालन. १० चलन यावरून प्राकृत चालणें. वि० ११ चालक.





१९२ चर्व्. (अ) भक्षणें. भू० १ चर्वित. भा० २ चर्वण ३ चर्व्य. ना० ४ चव्य. ५ चवक. (सुंठ, मिरीं, पिंपळी.)

१९३ चक्ष्. (इङ्) स्पष्ट बोलणें, पाहाणें. वि० १ विचक्षण २ चक्षुष्मान् ३ प्रख्यात. ना० ४ चक्षु. (डोळा) ५ आख्या ६ आख्यान ७ विचक्षणा.

१९४ चि. (उ.) जमवणें. भू० १ संचित. २ निश्चित. ३ परिचित ४ अपरिचित. ५ अनुचित वि० ६ अचिर ७ निश्चायक. ना० ८ चयन (यज्ञ) ९ चिता. १० चित्त. ११ नीच. १२ काय. (देह.) १३ संचय. १४ निश्चय. १५ परिचय १६ अपचय. १७ उपचय. १८ समुच्चय १९ चिंचा (चिंच)

१९५ चिट्. (अ) चाकर होणें. ना० १ चेट (गुलाम) २ चेटी (दासी)

१९६ चित्. (इ) स्मरण करणें भू० १ चिंतित. २ अचिंतित वि० चिंत्य. ४ अचिंत्य. ५ निश्चिंत. ना० ६ चिंता ७ चिंतना. ८ चेतस्.

१९७ चित्. (ई) जाणणें. ना० १ चित्. (चैतन्य) २ चेतना ३ चैतन्य. ४ प्रचेताः (वरुण.)

१९८ चित्र. चित्रविचित्र करणें, अद्भुत पहाणें. भू० १ चित्रित (चितरलेलें) वि० २ विचित्र ना० ३ चित्र (आश्चर्य) ४ चित्रक ५ चित्रा ६ चित्रकूल (चितारी.)

१९९ चिन्ह्. चिन्ह करणें भू० १ चिन्हित ना० २ चिन्ह (लक्षण) ३ सुचिन्ह. ४ दुश्चिन्ह.

२०० चिल्. (अ) वस्त्रें घेणें वि० १ सचेल (वस्त्रसुद्धां) २ कुचेल. ना० ३

चेल.(वस्त्र) ४ चेल (अधम)

२०१ चुद्. (अ) प्रेरणा करणें भू० १ चोदित वि० २ कुचोद्य. ३ चोद्य. ४ अचोद्य. ५ चोदक ना० ६ चोदना (आज्ञा) ७ चूलि. (चूल)

२०२ चुबु. (इ) चुंबन करणें भू० १ चुंबित. वि० २ चुंबक. ना० ३ चुंबन.

२०३ चुर. (अ) चोरणें ना० १ चौर्य (चोरी) २ चोर भू० ३ चोरित (चोरलेलें.)

२०४ चुल. (अ) रचणें. ना० १ चूलिका. (कानाचें मूळ)

२०५ चूर्ण्. (अ) पूड करणें भू० १ चूर्णि . ना० २ चूर्ण.

२०६ चूर्ण्. (अ) संक्षेपकरणें ना० १ चूर्णिका.

२०७ चुष्. (अ) चोंखणें भू० १ चोषित वि० २ चोष्य. ना० ३ चोषण.

२०८ चेष्ट. (अ) चेष्टाकरणें व्यापारकरणें भू० १ चेष्टित २ विचेष्टित वि० ३ कुचेष्ट ४ सचेष्ट ५ निश्चेष्ट ना० ६ चेष्टा. ७ कुचेष्टा.

२०९ च्यु. (ङ) गळून पडणें भू० १ च्युत (गळूनपडलेला) २ पदच्युत ना० ३ अच्युत (विष्णु) वि० ४ अच्युत.

## छ.

२१० छद्. (अ) आच्छादणें. भू० १ छन्न २ आच्छन्न ३ आच्छादित. ४ प्रच्छन्न. वि० ५ आच्छाद्य ६ आच्छादक. ना० ७ छत्र. ८ छात्र (शिष्य) ९ छद्म (कपट) १० छद (पान) ना० ११ आच्छादन.

२११ छद्. (इ) आच्छादितकरणें. वि० १ छांदस ना० २ छंद ३ छंदस्.

२१२ **छिद्.** (इर्) विभागणें, छेदणें **भू०** १ अवच्छिन्न २ अविच्छिन्न ३ छिन्न ४ उच्छिन्न ५ छेदित ६ विच्छिन्न **वि०** ७ अवच्छेदक ८ उच्छेदक ९ उच्छेदनीय १० उच्छेद्य **ना०** ११ विच्छेद. (अंतर) १२ छेद. १३ उच्छेद. **भा०** १४ अवच्छेदन. (कापणें) १५ उच्छेदन.

२१३ **छिद्र्.** छिद्रपाडणें. **भू०** १ छिद्रित. **वि०** २ सच्छिद्र. ३ अच्छिद्र **ना०** ४ छिद्र. (भोंक)

२१४ **छुर्.** (अ) कापणें. **भू०** १ छुरित **ना०** २ छुरिका.

२१५ **छो** (ओ) छेदनार्थ, **ना०** १ छवि. (आंधाराला छेदितेती कांती) २ छागबोकड.) **वि०** १ छात (तोडलेला)

## ज.

२१६ **जट्.** (अ) गुंतणें **ना०** १ जटा २ जटिल. ३ जटुल (शरीरावरील तीळ)

२१७ **जन्.** (अ) जन्मार्थ **ना०** १ जनन **वि०** २ जनित.

२१८ **जन्.** (ई) उत्पन्नहोणें **भू०** १ जात. २ अभिजात (सभ्य किंवा सत्कुलीन) ३ जनित **वि०** ४ निर्जन ५ अजन्मा. (ज्यास जन्म नाहीं तो) ६ विजातीय. ७ सजातीय ८ आजन्म (जन्मपर्यंत) ९ जन्य **ना०** १० जंतु. ११ जननी. १२ जन. १३ दुर्जन १४ सज्जन. १५ जन्म १६ अनुजन्मा १७ अनुज. १८ प्रजा १९ अभिजन (कुटुंब किंवा चाकर) २० अज २१ अजा **भा०** २२ जत्रू. (बाहुसंधी) २३ जनक (बाप) २४ जंतू. २५ जनपद. (देश)

२१९ जप्. (अ) मनांतल्यामनांत बोलणें, हळूबोलणें. भू० १ जपित वि० २ जाप्य. ३ जप्ता ना० ४ जप.

२२० जर्ज्. (अ) दुखवणें वि० १ जर्जर भू० २ अजर्जीरत.

२२१ जल्. (अ) उपविणें ना० १ जाल (जाळें) २ जालक (नवीपुष्पकळी)

२२२ जल्. (अ) पाझरणें ना० १ जल २ जड. वि० ३ जाड्य.

२२३ जल्प्. (अ) स्पष्ट बोलणें. भू० १ जल्पित वि० २ जल्पक ना० ३ जल्पना. ४ जल्पाक. (वाईट बोलणारा.) भा० ५ जल्पन.

२२४ जस्. (उ) विस्तृत होणें वि० १ अजस्त्र (निरंतर)

२२५ जागृ. जागें होणें भू० १ जागृत. वि० २ जागरूक. ३ जागृत ना० ४ जागृति. ५ कोजागर. भा० ६ जागरण ७ जाग्रिया ८ जागर्या.

२२६ जि. जयकरणें. भू० १ जित २ विजित ३ अजित. ४ पराजित ५ निर्जित. वि० ६ जयी ७ विजयी ८ जेता ९ जय्य. १० अजय्य. ११ जेय. १२ अजेय १३ जिगीषु. १४ जैत्र. १५ दुर्जय. १६ जिष्णु. ना० १७ जय. १८ विजय. १९ पराजय. २० जिगीषा

२२७ जम्. (उ) भक्षणकरणें. ना० १ जेमन (जेवण) भा० २ जेमित (जेवलेला)

२२८ जीव्. (अ) वांचणें भू० १ जीवित. वि० २ संजीवनी. ३ अनुजीव्य ४ निर्जीव. ५ उपजीव्य (यजमान) ६ उपजीवक (आश्रित) ७ अनुजीवक. ८ सजीव ९ उपजीवीकिंवाउपजीविन्. ना० जीव. ११ उपजीविका भा० १२ जीवन. १३ अनुजीवन १४ संजीवन १५ उज्जीवन १६ उपजीवन.

२२९ जु. गत्यादिअर्थ. ना० १ जवि: २ जूति: (वेग) ३ जवनिका (पडदा) वि० ४ जवन (वेगवान्)

२३० जुड्. (अ) जोडणें यावरून प्राकृतांत जोडणें, जोड. यापासून प्राकृत जूट.

२३१ ज्युत्. (भ्) प्रकाशमान होणें. वि० १ ज्योतिषी ना० २ जोति. ३ ज्योतिष.

२३२ जृम्भ. (इ) गात्रें ताणणें भू० १ उज्जृंभित. (विकसित) ना० २ जृंभा. (जांभई)

२३३ जृ. (ष) वृद्ध होणें. भू० १ जीर्ण. २ अजीर्ण भा० ३ जीर्णता. ना० ४ जरा. (म्हातारपणा) ५ जरन्.

२३४ जृ. वयोहानिहोणें वि० १ जरठ. २ निर्जर. ३ जर्जर. ४ अजर. ना० ५ जार. ६ जारज. ७ जठर. (पोट)

२३५ ज्वर. (अ) रोगहोणें. भू० १ ज्वरित वि० २ ज्वरी ३ विज्वर. ना० ज्वर: संज्वर.

२३६ ज्वल्. (अ) पेटणें भू० ज्वलित. २ प्रज्वलित ३ उज्वलित. ना० ४ ज्वाला. ज्वलन भा० ६ प्रज्वालन. ७ उज्वलन. यावरून प्राकृतांत उजळ, उजळणें.

## झ.

२३७ झष् (अ) हिंसाकरणें ना० १ झष (लहान मत्स्यांस खातो तो मासा)

## ट.

२३८टङ्क. (इ) बांधणें ना० १ विटंक (पक्ष्याकरितां केलेला घरटा) २टंक (टांकी.) वि० ३टंकित.

२३९टीकृ. (अ) जाणें वि० १ सटीक. ना० २टीका.

## ड.

२४०डबृ. (इ) निंदा, थट्टा, करणें. ना० १विडंबन. २विडंबना.

२४१डी० (ङ) आकाशगमन. भा० १डयन (उडणें) ना० १ गरुडपक्षी.

## ण.

२४२णटू. (अ) नाचणें, हावभावकरणें ना० १ नट. २नटी. ३नाटक. भा० ४नाट्य. वि० ५नटत्त.

२४३णदू. (अ) अव्यक्तध्वनिहोणें. भू० १नादित. वि० २सवाद ना० ३नाद. ४नदी. ५निनाद. ६प्रणाद.

२४४णभू. (अ) हिंसाअर्थ. ना० १ नभाः (श्रावणमास)

२४५णमू. (अ) वंदन, नमस्कार करणे, शब्द करणें. (नंमू, नाम) भू० १नमित. २उन्नमित. ३नत. ४प्रणत. ५विनत ६उन्नत वि० ७नम्र ८नम्य ९प्रणम्य. ना० १० नाम (नाव) ११ नामधेय १२प्रणाम. १३उन्नति. १४परिणाम. १५नति १६विनती. १७ नमस्कार. भा० १८ नमन १९उन्नमन.

२४६णलू. (अ) बांधणें ना० १नल (नळ) २अनल (अग्नि) ३प्रणाली. ४प्रणालिका. ५नलिन (कमळ) भू० ६नलित.

२४७णशू. (अ) नाहींसें होणें भू० १नष्ट. २विनष्ट ३प्रनष्ट. वि० ४ नाशक.

५अविनाशक. ६विनाशी. ७अविनाशी ८नश्वर ना० ९ नाश १०विनाश भा० ११ नाशन.

२४८ णह्. (अ) बांधणें वि० १ सन्नध्ध. ना० १ नभ. (आकाश.) २ नभस्वान् (वायु) ३ नध्री. (चामडयाचा राजू.)

२४९ णास्. (अ) शब्द, ध्वनि करणें ना० १ नासा. (नाक) २ नासिका (नाक)

२५० णिद्. (इ) निंदा, धिःकार, अपमान करणें. भू० १ निंदित. वि० २ निंद्य. ३ निंदक. ना० ४ निंदा भा० ५ निंदन.

२५१ णी. (अ) पोंचविणें भू० १ नीत. २ अनीत. ३ अनुपनीत. ४ विनीत. वि० ५ नायक. ६ विनायक ७ विनेता (गुरु, वाटाड्या) ८ प्रणयी. ९ अपनेता. ना० १० नेत्र. ११ उपनेत्र. (चष्मा) १२ नय (न्याय) १३ विनय. १४ निर्णय. १५ उन्नय. १६ उपनयन (मुंज) १८ अनुनय १९ परिणय. (विवाह) २० आनाय. (जाळें) २१ प्रणय (प्रीती विश्वास) २२ अभिनय (विनंतीकरणें) २३ अपनय (दूरकरणें) भा० नयन (नेणें)

२५२ णु. स्तुतिकरणें ना० १ प्रणव. नुति. (स्तुति) भू० २ नुत (स्तुतिकेलेला)

२५३ णुद्. (अ) प्रेरणा करणें भू० १ नोदित. वि० २ विनोदी ३ नुन्न ४ नुत्त (प्रेरित) भा० ४ विनोदन. ना० ५ नौका.

## त.

२५४ तट्. (अ) रचणें. वि० १ तटी. ना० २ तटाक. ३ तट. ४ तटिनी (नदी)

२५५ तड्. (अ) आघात करणें भू० १ ताडित ना० २ तडित. (विद्युल्लता) ३ व

डित्वान् (मेघ) ४ तडाग ५ ताड. भा० ६ ताडन.

२५६. तन्त्र. (इ) कुटुंब धारण करणें, एकत्र करणें ना० १ तंत्रिका (अविवि स्तार द्वारा कुटुंब धरित्ये ती)

२५७ तनू. (उ) विस्तार करणें वि० १ उत्तान (उताणें) २ नितांत ३ तत (आ म्हणे) ना० ४ तनय ५ तनु. (शरीर) ६ तंतु ७ वितान (छत्र) ८ वित उ (चादणी) ९ तंत्र (विस्तार)

२५८ तपू. (अ) तापणें भू० १ तप्त २ संतप्त ३ तापित. ४ अनुतप्त वि० ५ अनुतापी ६ तापस (तपस्वी) ना० ७ ताप. (उष्णज्वर) ८ संताप ९ अनुताप १० पश्चात्ताप. ११ तप १२ आतप (ऊन) १३ तपन (सूर्य) भा० १४ तापन. (तापविणें)

२५९ तमू. (अ) अंध होणें वि० १ तामस. ना० २ तमस् ३ तमस्विनी (रात्र)

२६० तर्क. (अ) कल्पना करणें भू० १ तर्कित. २ वितर्कित वि० ३ तर्क्य ४ वितर्क्य ५ अतर्क्य ना० ६ तर्क ७ वितर्क ८ कुतर्क यावरून भा कुतार्किक तर्कटा.

२६१ तल. (अ) स्थापन करणें ना० १ तल (तळ) २ ताल (गायनांतील प्रकार.) ४ भूतल ५ अतल ६ वितल ७ सुतल ८ तलातल ९ म हातल १० रसातल.

२६२ तसू (उ) नाहींसें करणें ना० १ तस्कर.

२६३ तसू. (इ) शोभिवणें ना० १ अवतंस (तुरा) २ उत्तंस (तुरा) ३ कुल

दीपक.) ३अवतमसं (क्षीणांधकार)

२६४ तिज्.(अ) तीक्ष्णकरणें भू०१ तीक्ष्ण. वि०२उत्तेजक ३सतेज. ४ निस्तेज ५तेजस्वी ६तेजःपुंज ७तेजोमय ८तेजित ना०९ तेज भा० १०उत्तेजन.

२६५ तिरस्. अदृश्य करणें. भू०१तिरस्कृत ना०२तिरस्कारिणी (पडदा) ३तिरस्कार ४तिरस्क्रिया (अपमान)

२६६ तिल्. शोभार्थ. ना०१तिलपर्णी (औषधी) २तिलक (टिळा)

२६७ तिल्.(अ) स्नेह ह्मणजे स्निग्धपणा करणें ना०१तिळ. २तेल. ३तिल पेज (वांझतिळ) ४तिल्य (तिळांचेंशेत)

२६८ तीर. कर्मसमाप्तिकरणें ना०१तीर (नदीची मर्यादा)

२६९ तीव्.(अ) अतिशयित होणें वि०१तीव्र.

२७० तुड्.(इ) तोडणें ना०१तुंड यावरून माकृत तोंड. २तुंडिकेरी (तोंडली)

२७१ तुद्.(अ) व्ययादेणें. ना०१ तुत्थ. (मोरचूत) २तुंद (पोट) ३तुंदी. ४तुं दिल. (दोंदील) ५तुन्नवाय (शिंपी) ६तोत्र (चाबूक) वि०७तोदि न. भा०८तोदन.

२७२ तुब्.(इ) पीडाकरणें ना०१तुंबुरु. २तुंबी. ३तुंबरी (काळ्यापोपळा)

२७३ तुर्.(अ) तराकरणें वि०१आतुर ना० २तुरंग (घोडा) ३तुरंग म (घोडा) ४तुरायण (यज्ञविशेष)

२७४ तुल्.(अ) तोलणं भू०१ तोलित वि०२ तुल्य ३अतुल. ना०४तु

स्त्री. ५ तुलना भा० तोलन.

२७५ तुष्. (अ) संतुष्ट होणें. भू० १ तोषित. वि० २ तुष्ट. ३ संतुष्ट. ४ संतोषी. ५ तोषक. ६ परितोषिक ना० ७ तुष (कोंडा) ८ तुषार (जलबिंदु व बर्फ) ९ तुष्टि १० तोष ११ संतोष भा० १२ तोषण.

२७६ तूण्. (अ) पूर्णकरणें ना० १ तूणीर (भाता) २ तूण तूणी (भाता)

२७७ तूल्. (अ) बाहेरनिघणें ना० १ तूल (कापूस) २ तूलिका (सोनारा चीसळई वगादी)

२७८ तृण्. (उ) भक्षणें ना० १ तृण (गवत) २ तृणद्रुम (ताड) ३ तृण- धान्य (सांवेवर्या) ४ तृण्या (गवताचागंज)

२७९ तृप्. (अ) संतुष्टहोणें वि० १ तृप्त. २ अवतृप्त. ३ आतृप्त ४ तर्पित ५ अतितृप्त ना० ६ तृप्ति. ७ अतितृप्ति. भा० ८ तर्पण. ९ संतर्पण.

२८० (अ) तृ. ष् तानलागणें. भू० १ तृषित. ना० २ तृषा. ३ तृष्णा. ४ तृ ष्णाक्. (तृष्णाशील)

२८१ तॄ. नावेंतूनजाणें, तरणे. (तर, तार, तीर.) भू० १ अवतीर्ण २ उत्तीर्ण. ३ तीर्ण ४ विस्तीर्ण वि० ५ तारक ६ अनुत्तर ७ दुस्तर ८ उत्तार्य ९ अवतार्य. १० अवतारी ना० ११ तालु १२ तिर. (गुप्त) १३ तीर्थ १४ तारा १५ तरणी १६ तरु १७ तरंग १८ निस्तार १९ उत्तर २० प्रत्युत्तर २१ प्रस्तर २२ उत्तार २३ अवतार भा० २४ तारण २५ अवतरण २६ निस्तरण २७ तरण यावरून प्राकृत (तर, उतारु.

तारूं, तरंगणें.

२८२ त्रपू. (ऊष्) लाजणें ना० १ त्रपा (लज्जा) २ त्रपू (कथिल)

२८३ त्रसू. (ई) उद्वेग होणें म्ह० भिणें भू० १ त्रस्त २ संत्रस्त ३ त्रासित ४ वित्रस्त वि० ५ त्रसु ६ त्रासक. ना० ७ त्रास भा० ८ त्रसन.

२८४ त्रुट्. (अ) छेदणें म्ह० तोडणें भू० १ त्रुटित भा० २ त्रोटन. यापासून शकून तोडणें ना० ३ (पक्ष्याची चोंच) ४ त्रोटि ५ त्रुटि (कालमानविशेष.)

२८५ त्रै. (ङ) पालन करणें भू० १ त्रात (रक्षिलेला) वि० २ त्राता भा० ३ त्राण. ४ परित्राण.

२८६ त्यज्. (अ) हानि करणें, टाकणें भू० १ त्यक्त. वि० २ त्याज्य ३ परित्यजनीय ४ त्यागी ना० ५ त्याग ६ परित्याग भा० ७ त्यजन.

२८७ (आ) त्वर् (आ) त्वरा करणें भू० १ त्वरित वि० २ सत्वर ना० ३ त्वरा.

## द.

२८८ दंड्. (अ) शासन करणें भू० १ दंडित. वि० २ उद्दंड ३ दंड्य ४ दंडनीय ५ दंडक ना० ६ दंड. ७ दंडनीति (अर्थशास्त्र) ८ दंडधर (राजा) भा० ९ दंडन.

२८९ दद्. (अ) दान करणें वि० १ अदत्त. दत्त (दीलेलें)

२९० दंभ्. (उ) दंभ, ढोंग करणें. वि० १ दांभिक. ना० २ दंभ (ढोंग)

२९१ दम्. (उ) उपशम करणे, शमविणें भू० १ दांत २ दमित (शमविले

ग्य) वि० ३उद्दाम ४दम्य ५दमी ना० ६दम ७दंत ८दंती (हत्ती)

भा० ९दमन.

२९२दय्. (अ) रक्षणकरणें भू० १दयित (प्रिय) २दयिता (प्रिया) वि०

३दयालु ४सदय. ५अदय ६निर्दय. ना० ७दया.

२९३दरिद्रा. गरीब होणें वि० १दरिद्र २दरिद्रित: (निर्धन) ३दरिद्री. ना०

४दारिद्य.

२९४दल्. (अ) विदारण करणें, फोडणें, तुकडे, करणें. भू० १दलित २विदलि

त ना० ३दल (सैन्य, पर्ण) भा० ४निर्दलन. ५दलन यापासून मरा

ठीत दळणें.

२९५दश्. (इ) चावणें भू० १दंशित. ना० २दंश ३उपदंश. भा० ४दंशन.

२९६दंश्. (अ) चावणें भू० १दष्ट. ना० २दशन ३दशा (बाल्यादि अवस्था)

२९७दह्. (अ) भस्मकरणें वि० १दग्ध. २विदग्ध (वैराग्ययुक्त) ना० ३दाह ४

दहन (अग्नि) भा० ५दहन (जाळणें) ६वैदग्ध्य.

२९८दक्ष्. (अ) त्वराकरणें वि० १दक्ष (व्यवहारचतुर) ना० २दक्षिण (स

रळ वागणारा व उदार)

२९९ दस्. (उ) उपक्षय ना० १दासी.

३०० दा. (ण) दानकरणें भू० १दापित वि० २दाता ३देय ४अदेय ५उपादे

य ६दापनीय ७दाप्य ८दापक ९दत्तक ना० १०दाय (वांटा) ११सं

प्रदाय (कुलपरंपरागत धर्म.) १२निदान १३उपादान १४दान.

१५कुदान भा०१६दापन.

३०१ द्रा धार्ईटगति ना०१निद्रा.२तंद्रा(आळस)भू०३निद्राण वि०४ निद्रालु.५उन्निद्र.भू०६निद्रित.

३०२ दसु.(इ) पाहाणें ना०१दास ३हरिदास भा०४दास्यत्व.

३०३ दिवु.(उ) क्रीडाकरणें,प्रकाशणें ना०१देवन (क्रीडा) २द्यूत ३देव. ना०त्रिदिव:(स्वर्ग) ५दिवस (दिव्यंत्यत्रेति)

३०४दिशु.(अ) देणें भू०१उपदिष्ट २आदिष्ट ३उद्दिष्ट ४ निर्दिष्ट वि० ५उपदेष्टा.६ उपदेशक ना०७दिशा ८विदिशा ९दिष्ट (दैव,काल)१०देशा.११विदेश.१२उपदेश.१३उपदिशा १४अतिदेश १५आदेश १६उद्देश १७दिक् १८विदिक् १९निदेश (आज्ञा)२०संदेश (बातमी) २१निर्देश.(आज्ञा)

३०५दिहू.(अ) जमविणें वि०१संदिहान २विदेही ना०३देह ४संदेह.

३०६दी.(ङ) क्षयहोणें वि०१दीन भा०२दैन्य ३उदात्त ४अनुदात्त.(स्वरविशेष)

३०७दीधी(ङ) प्रकाशकर्णे व क्रीडा ना०दीधिती (कांती)

३०८दीपू.(ई) प्रकाशणें भू०१दीप्त.२प्रदीप्त.वि०३उद्दीपक ४देदीप्यमान ना०५दीप.६प्रदीप.७दीप्ति भा०८उद्दीपन ९संदीपन (पेटवणें)

३०९दीक्षु.(अ) यज्ञकरणें; दीक्षा,व्रत,देणें भू०१दीक्षित ना०२दीक्षा.

३१० दुःख. दुःखदेणें भू० १ दुःखित वि० २ निर्दुःख ३ सदुःख ४ दुःखी. ना० ५ दुःख.

३११ दुल्. (अ) डोलणें भू० १ आंदोलित २ दोलायमान ना० ३ आंदोला. (झोंपाळा) ४ दोला ५ आंदोलक. भा० ६ आंदोलन यापासून मा कृत (हिंदुळा व आंदुळा)

३१२ दुष्. (अ) वाईट काम करणें वि० १ दुष्ट. २ दोषी ३ सदोष ४ निर्दोष ना० ५ दोष ६ प्रदोष ७ निर्दोष ८ दोषा (रात्र)

३१३ दुह्. (अ) प्रपूरण करणें दूध काढणें वि० १ दोग्धा ना० २ दोहद (डोहाळा) ३ दोहदवती ४ दुग्ध भा० ३ दोहन (दूध काढणें)

३१४ दूष्. (अ) दोष लावणें भू० १ दूषित वि० २ दूषक ३ दूष्य भा० ४ दूषण ना० ५ दूष्या ६ दूष्याषिका.

३१५ दृ. (ऊ.) आदर करणें भू० १ दृत २ आदृत ३ अनादृत. ना० ४ आदर ५ अनादर ६ दृति (पखाल)

३१६ दृप्. (अ) हर्ष होणें, उन्मत्त होणें. भू० १ दृप्त २ दर्पित. ना० ३ दर्प ४ कंदर्प (कामदेव) ५ दर्पण.

३१७ दृभ्. (अ) ग्रथन करणें ना० १ दर्भ २ संदर्भ वि० ३ संदर्भित.

३१८ दृश्. (द्रू) पाहाणें भू० १ दृष्ट. २ दर्शित ३ प्रदर्शित वि० ४ दर्शक. ५ दर्शी ६ दृश्य ७ अदृश्य ८ दर्शनीय ९ द्रष्टा १० उपद्रष्टा (सांगणारा) ११ दुर्दर्श १२ द्रष्टव्य १३ प्रदर्शक ना० १४ दृष्टि १५ अदृष्ट १६ दृक्.

१७दर्शी १८आदर्श १९सुदर्शन. भा० २०दर्शन २१प्रदर्शन २२निदर्शन २३अदर्शन.

३१९ दॄ. विदारणकरणें, फाडणे. भू० १ विदारित:वि० २विदार्य ना० ३दारु (लांकूड) ४दारा (स्त्री) ५दारद (विष) ६दर्दुर. ७दरी (गुहा) भा० ८विदारण ९दारण.

३२० द्युत्. (अ) प्रकाशणें भू० १द्योतित. वि० २द्युतिमान् ३द्योतक ना० ४द्युति, (प्रकाश) ५खद्योत. द्यौ: (स्वर्ग) भा० ६द्योतन

३२१ द्रु. जाणें ना० १द्रव्य २द्रव ३द्रुम ४द्रु. (वृक्ष) ५द्रुतं. (शीघ्र)

३२२ द्रुण्. (अ) हिंसार्थ ना० १द्रुण (विंचू)

३२३ द्रुह्. (अ) ठार मारण्याची इच्छा करणें, द्वेषकरणें. वि० १द्रोही २द्रोहक ना० ३द्रोह. भा० ४द्रोहन.

३२४ द्विष्. (अ) अप्रीतिकरणें, द्वेषकरणें. भू० १द्विष्ट. २विद्विष्ट वि० ३द्वेषी ४द्वेष्य. ५द्वेष्टा ६द्वेषक ७विद्वेषी ८विद्वेष्टा ना० ९द्वेष १०विद्वेष ११द्विट्. १२द्विषत्. (शत्रू)

३२५ दॄ. आच्छादणें, स्वीकारकरणें ना० १द्वार. २द्वा:स्थ ३द्वास्थित (द्वारपाळ) यावरून माकून कवाडास दार, दरवाजा.

## ध.

३२६ धन्. (अ) धान्य उत्पन्नकरणें वि० १धनिक २धनवान् ३धन्य ४निर्धन ५सधन ना० ६धन ७धनद ८धनंजय.

४निर्धन ५सधन ना० ६धन ७धनद ८धनंजय.

३२७ धनु (अ) शब्दार्थ ना० १धनुः २धनुष्य :

३२८ धन्व् (इ) जाणें ना० १धन्व (धनुष्य) वि० २धन्वा (धनुष्य आहे ज्यास)

३२९ (डु) धा (अ) पोषणकरणें भू० १अभिहित २प्रहित ३विहित (वों गडें) वि० ४उपधायक ५धाता ६विधाता ७प्रधान ८अप्रधान ९अभिधेय १०अभिधायक ११विधायक १२विधेय ना० १३निधिः १४निधन (मरण) १५धातु १६समाधान १७उपाधान १८अभिधा (नाव) १९अवधि २०प्रधि २१विधि २२धात्री (दाई) भा० २०वि धान २१विधापन.

या धातूचे पोषण करणें आणि धारण करणें असे दोन अर्थ आहेत. त्यांतून पोषण करणें याअर्थाचे शब्द वर लिहिले आतां दुसऱ्या अर्थाचे शब्द लिहितों.

भू० १परिहित २परिधापित वि० ३परिधानीय ४परिधापयिता ना० ५अवधान ६अनुसंधान ७संधान ८संधि भा० ९परिधान १०परिधापन.

३३० धाव् (उ) धावणें, निर्मल करणें भू० १धावित वि० २प्रधावी (धांवणारा) ना० ३दंतधावन ४धावनी (स्वच्छ करणारी) ५धौवन भा० ६धावन (पळणें).

३३१ धी. धारण भू० १आच्छादन करणें ना० २विरोधान ३अंतर्धान.

३३२ धी. अनादर. ना० १अभिधान.

३३२ धूप्. (अ) तापवणें क्रू० १ धूपित ना० २ धूप. वि० ३ धूपायित.

३३३ धू. विधूनार्थक ना० १ धव (नवरा) २ धवल वि० ३ धवित.

३३४ धु. (अ) कंपनार्थ. वि० १ धूत. ना० २ पवित्र (पंखा)

३३५ धृ. (अ) धारणाकरणें क्रू० १ धृत २ विधृत ३ निर्धारित ४ धु धारित. वि० ५ धारक ६ धर्मी ७ धर्मिष्ठ ८ निराधार ९ धार्मिक १० धर्म्य ११ धर्त्ता १२ धारयिता १३ धारणिक (कर्जघेणा रा) १४ साधारण १५ निर्धारी ना० १६ धारण १७ धरा १८ निर्धार १९ धर्म २० अधर्म २१ धारा २२ आधार २३ धरित्री २४ धरणी २५ धृति २६ निर्धार २७ सुधारणा भा० २८ धारण २९ धरण ३० संधारण ३१ सुधारण.

३३६ (ञि) धृष्. (आ) गंभीर असणें क्रू० १ धृष्ट (दांडगा) ना० २ धार्ष्ट (धारिष्ट) ३ धिषणा (बुद्धी) ४ धिषण (गुरू) ५ धिष्ण्यं (स्थानं)

३३७ धृष्. (अ) असहन करणें क्रू० १ धर्षित. वि० २ दुर्धर्ष ३ धर्षणी (अभिचारिणी) भा० ४ धर्षण. (जरब घालणें) ना० ५ धृष्ट. (दांडगा)

३३८ धेट्. (इ) पानकरणें. ना० १ सुधा (अमृत) २ धेनु ३ विधु: (चंद्रमा)

३३९ ध्मा. फुंकणें, वाजिवणें, पेटविणें, (धम्) ना० १ धमनी (फुंकणी, रक्तवाहिनीशीर) २ धमन (भाता) वि० ३ ध्मात

३४० ध्यै. चिंतन करणें भू० १ ध्यात वि० २ ध्याता ३ ध्येय ४ ध्यानय ना० ५ धी (बुध्धि) ६ संध्या ७ अनुध्यास ८ निदिध्यास भा० ९ ध्यान १० निदिध्यसन ११ ध्मात (तृणजाती)

३४१ धोकृ. (आ) गतिचातुर्य ना० १ धोरण (वाहन) २ आधोरण (माहात)

३४२ ध्रुव. } (अ) स्थिर असणें, जाणें ना० १ ध्रुव (ध्रुवतीति)
ध्रु. }

३४३ ध्वन. ध्वनिकरणें भू० १ प्रध्वंसित ना० २ ध्वनि ३ प्रतिध्वनि ४ ध्वान भा० ध्वनन.

३४४ ध्वंस. (उ) नाशपावणें. भू० १ प्रध्वंसित. वि० २ उध्वस्त ना० ३ ध्वंस ४ प्रध्वंस ५ विध्वंस भा० ६ ध्वंसन.

३४५ ध्वाक्ष. (इ) घोरशब्दकरणें ना० १ ध्वांक्ष (कावळा)

३४६ ध्वृ. वांकणें (मूर्छना) ना० १ अध्वर्यु (ऋत्विज) २ अध्वर (यज्ञ)

न.

३४७ नट. (अ) नाचणें ना० १ नट २ नटी ३ नाटक भा० ४ नटन ५ नाट्य. यावरून प्राकृत नटणें.

३४८ (टु) नद. (इ) वृद्धिपावणें भू० १ आनंदित २ आनंदी ना० ३ आनंद ४ नंदन (पुत्र) ५ नांदी भा० ६ नंदन (आनंद करणें) ७ अभिनंदन (स्तुतिकरणें) वि० ८ नंदक (आनंद करणारा.)

३४९ नाथ्. (ऊ) शक्तिमान् असणें, आशीर्वाद देणें वि० १ सनाथ २ अनाथ. ना० २ नाथ (यजमान)

३५० नी० पोंचविणें ना० १ नीप (नीव) २ नीर (जल)

३५१ नी. (ब्) पोंचविणें वि० १ नेत्री.

३५२ नुद्. प्रेरण तु० वि० १ नुन्न: (पाठविलेला) भा० २ नुद: ३ नोदन (प्रेरणा)

३५३ नील्. (अ) रंगदेणें वि० १ नील (निळें) ना० २ नील (निळारंग) ३ नीली (माशी)

३५४ नृत्. (ई) नाचणें वि० १ नर्तक २ नर्तकी ३ नृत्य भा० ४ नर्तन.

३५५ नृ. नीतिनें वागणें ना० १ नर २ नारी ३ नरक.

३५६ न्हु (हु) नेणें ना० १ निन्हव (निषेध, शहपणा) २ अपन्हव.

प.

३५७ पच्. (इ) व्यक्त, स्पष्टकरणें ना० १ प्रपंच वि० २ प्रपंची

३५८ (डु) पच्. (अव्) शिजविणें भू० १ पाचिन. क्रि० २ पक्व ३ परिपक्व ४ अपक्व ५ पाचक ६ पक्का ना० ७ पाक ८ परिपाक ९ विपाक भा० १० पाचन ११ पचन.

३५९ पट्. (अ) मासनार्थी ना० १ पट (वस्त्र)

३६० पट्. (अ) आणें भू० १ उत्पाटित वि० २ उत्पाट्य ३ अनुत्पाट्य ४ उंपट ना० ५ पटोल (पड वळ) ६ परिपाट ७ परिपाटी भा० ७

उत्पाट.
उत्पाटन. प्राकृतांत परिपाठ ह्मणतात.

३६१ पठ्.(अ) पढणें भू०१ पठित २ पाठित वि०३ पाठक (पढविणारा) ४ पठनीय ५ पाठनीय ६ पाठ्य ७ पठ्यमान ना०८ पाठ ९ अपपाठ भा०१० पठन ११ पाठन.

३६२ पड्.(इ) जाणें वि०१ पंडित. ना०२ पंडा (बुध्धी)

३६३ पण्.(अ) देव घेव, व्यवहार, करणें वि० १ पण्य ना०२ आपण (बाजार) वि० ३ पणितव्य.

३६४ पत्.(ऌ) जाणें व पडणें ना०१ पत्र २ पतत्र (पिस) ३ पतत्री (पक्षी) ४ पाताळ भू०५ पतित ६ पातित ७ पतग (पक्षी) ८ पातक ९ निपात १० अतिपात ११ संपात १२ प्रपात (प्रवाह) १३ पतंग (दीपमाळवणारा प्राणी) १४ पताका भा०१५ निपतन १६ पतन वि०१७ पतयालु (पडणारा)

३६५ पथ्.(ए) जाणें, चालणें वि०१ पथिक २ पथ्य ३ अपथ्य ४ कुपथ्य ५ पाथेय (मार्गांतफराळास घेतलेलें) ना०६ पथ ७ पंथा ८ अपथ ९ कुपथ १० पांथ (मार्गस्थ)

३६६ पद्.(अ) जाणें. भू०१ संपादित २ आपादित ३ प्रतिपादित ४ निष्पादित वि०५ संपन्न ६ उत्पन्न ७ आपन्न ८ उपपन्न ९ निष्पन्न १० व्युत्पन्न ११ प्रपन्न (शरणागत) १२ पद्य (आभ्यासयोग्य) १३ संपाद्य १४ संपादक १५ आपाद्य १६ आपादनीय १७ व्युत्पा

द्य १८उपपादक १९ उत्पादक २० उत्पतिष्णु २१ उत्पाद्य २२उत्पाद नीय २३ प्रतिपाद्य २४ प्रतिपादक २५ प्रतिपादनीय ना० २६प द २७ पाद २८संपत्ति २९ संपदा ३० विपदा ३१ विपत्ति ३२आ पत्ति ३३आपदा ३४ निष्पत्ति ३५विप्रतिपत्ति ३६ व्युत्पत्ति ३७ पद्य (श्लोक) ३८ पदवी ३९ उत्पत्ति ४० उपपत्ति ४१प्रसा न ४२अनुपपत्ति भा० ४३ प्रतिपादन ४४उपपादन ४५ संपा दन ४६आपादन ४७उत्पादन इत्यादि०

३६७ पन्. (अ) स्तुतिअर्थ. वि० १ पनायित २पनितना० ३पनस (फणस)

३६८ पर्ण्. हिरवेंगार होणें ना० १ पर्ण (पान) २ पर्णशाला

३६९ पर्व्. (अ) भरणें, पूर्णकरणें ना० १ पर्व (पौर्णिमा) (अमावास्या पेर) २ पर्वत.

३७० पल्. (अ) पळणें, जाणें भू० १ पलायितना० २ पल (पळ बारतोळे) पांस) भा० ३ पलायन याचरूप प्राकृतांत पळणें. ४पलगंड (गवंडी) ५पलल ६ पलांडु. (कांदा) ७पलाश ८पलिक्नी (पिक लेकेंशांचीस्त्री) ९ पल्यंक (पलंग) १० पलित (वृद्धत्वानें केशांस पांढरेपण) ११ पल्लव १२ पल्वल.

३७१ पश्. (अ) बांधणें वि० १विपाशा (मुक्त) २पाशी (ज्यापाशीपा शआहेतो) ना० ३पाश ४ पशु.

३७२ पक्ष्. (अ) स्वीकारणें वि० १विपक्षी २प्रतिपक्षी ३सपक्षी

४असत्वपक्षी ना० ५पक्षी ६पक्ष ७विपक्ष ८प्रतिपक्ष ९स्वपक्ष १०दुष्पक्ष ११सत्पक्ष १२असत्पक्ष १३पक्ष्म.

३७३ पा. पिणें वि० १पेय २पानीय ना० ३पात्र ४अनुपान भा० ५पान ना० ६प्रपा ७(पाणपोई) पीव (प्याला) ८पाथः (उदक)

३७४ पा. रक्षणाकरणें ना० १पाप (पात्यस्मादात्मानं) २पति (नवरा)

३७५ पार. संपणें ना० १पार (नद्यादिकाचें पर -- तीर) वि० २अपार ३पारीण.

३७६ पाल्. (अ) रक्षणें भू० १पालित २प्रतिपालित ३परिपालित वि० ४परिपाल्य ५पालक भा० ६पालन ७परिपालन.

३७७ पिज्. (इ) वर्णवाचक व हिंसार्थे वि० १पिंगलः २पिंगट (रंग) ३पुंज (राशी)

३७८ पिछ्. (अ) छेदनार्थे. ना० १पिच्छ (पीस) वि० २पिच्छल (दाट)

३७९ पिट्. (अ) गणनाकर्णे. ना० १पिट. (पांटी) २पिटक (अलंकार वस्त्रें ठेवण्याची पेटी) ३पिठर (तपेली वगैरे)

३८० पिड्. (इ) गोळाहोणें. जमाहोणें ना० १पिंड २पिंडी ३सपिंड ४सपिंडी भा० ५सापिंड्य.

३८१ पिश्. (अ) अवयवार्थे. ना० १पिशित (मांस) २पिशाच ३पिशुन (दुर्जन)

३८२ पिष्. (लृ) चूर्णकरणें भू० १पिष्ट २पेषित वि० ३पेषक ४पेष्य.

ना० ५ पाषाण पाषाणदारण (टांकी) ६ पेषणी (जातण) ७ पिष्ट भा० ८ पेषण.

३८३ पी (ङ्) प्राशनकर्णे ना० १ पय (दूध व पाणी)

३८४ पीड्. (अ) दुःखदेणें भू० १ पीडित वि० २ पीडक ३ पीड्यमान ना० ४ आपीड (तुरा) ५ पीडा भा० ६ पीडन ७ आपीडन.

३८५ पुच्छ् (अ) चुकणें, दुर्लक्षकरणें ना० १ पुच्छ

३८६ पुण्. (अ) शुभकर्म करणें, धर्मनिष्ठ होणें. वि० १ पुण्यवान् ना० २ पुण्यजन (राक्षस) ३ पुण्य (भूमि) भा० ४ पुण्य यावरून त्याकडून पुण्याई ना० ५ पुण्यजनेश्वर (कुबेर)

३८७ पुर्. (अ) पुढारी होणें ना० १ पुरी (नगरी) २ पुर वि० ३ पुरा (पूर्वी)

३८८ पुष्. (अ) पोसणें, वाढवणें भू० १ पोषित. वि० २ पोषक ३ पोष्य ४ पुष्ट. ५ पुषित (पुष्कळ) ना० ६ पुष्टि ७ पुष्कर (कमळ, आकाश, उदक). पुष्करिणी. पुष्य. (नक्षत्र) भा० पोषण.

३८९ पुष्प्. (अ) विकसणें, फुलणें भू० १ पुष्पित ना० २ पुष्प.

३९० पुस्त्. (अ) सन्मानकर्णे ना० १ पुस्तक.

३९१ पू. (अ) पवन म्हणजे पवित्र होणें भू० १ पूत २ पुनीत. वि० ३ पवित्र ना० ४ पावकः ५ अग्निः ६ पवि (वज्र) ७ पवन (वा. यु.) ८ पव: ९ पूग (सुपारी).

पवन पवमान पुत्र भा० पावन.

३९२ पूज्. (अ) पूजा, सन्मान करणें. भू० १ पूजित वि० २ पूजक ३ पूज्य ४ अपूज्य ना० ५ पूजा भा० ६ पूजन.

३९३ पूर्. (इ) संतोषविणें, आनंदविणें भू० १ पूरित वि० २ पूर्ण ना० ३ पूर. भा० ४ पूरण ना० पूरणी. (शेंवरीचें झाड) ६ पूर्णिमा.

३९४ पूर्व. (अ) पूरणार्थ वि० १ पूर्वज २ पूर्व

३९५ पृ. (इ.) व्यायाम ह्म० उद्योग करणें भू० १ व्यापारित ना० २ व्यापार (वरील शब्दांत, वि आणि आ हे दोन उपसर्ग लागले आहेत)

३९६ पृच्. (अ) स्पर्श संयोग करणें, (पृक्त, पर्क.) भू० १ संपृक्त (मिश्रित) ना० २ संपर्क भा० ३ संपर्चन.

३९७ पृथ्. (अ) प्रक्षेप ह्मणजे टाकणें निराळें करणें वि० १ पृथक्.

३९८ पृ. पूर्ण करणें, भरणें भू० १ पूरित वि० २ पूरक ३ पूर्ण ४ परिपूर्ण ५ अपूर्ण ६ संपूर्ण भा० ७ पूर्ति ८ परिपूर्ति ९ पूरण ना० १० पूर्त.

३९९ पृच्छ्. (अ) पुसणें (पृच्छ) भू० १ पृष्ट (पुसलेलें) वि० २ पृच्छक ३ प्रश्न ना० ४ प्रश्न भा० ५ पृच्छा.

४०० पृथ्. (अ) प्रख्यात, किर्तिमान् होणें भू० १ प्रथित भा० २ प्रथा (लोकप्रसिद्धि) ३ प्रथन.

४०१ प्री. (अ) प्रीतिकरणें भू० १ प्रीति वि० २ प्रेष्ठ ३ प्रिय ४ अप्रि

य ५विप्रिय ६प्रिया. भा० ७प्रीति.

४०१ प्री. (ह्) तृप्तकरणें भू० १अभिप्रेत ना० २अभिप्राय.

४०२ प्रेष्. (क्र्) जाणें, पाठवणें भू० १प्रेषित. वि० २प्रेषक भा० ४प्रेषण.

४०५ प्लु. (ङ्) जाणें भू० १प्लुत (पळालेला) ना० २प्लुव (उडी, होडी, पाहुणें, चांडाळ-) ३उत्प्लुव (होडी) ४उपप्लुव (उपद्रव) भा० ५प्लुवन.

४०६ प्लुष्. दाहार्थक. वि० १प्लुष्ट (जळालेला) भा० २प्लोषः (दहन)

फ.

४०७ फण्. (अ) जाणें ना० १फणा (सर्पाची फडा) २फणी (नाग) फांट.

४०८ फल्. (जि) फुटणें अर्थ. भू० १फलित वि० २फल्गु (अल्प) ३सफल ४निष्फल ५विफल ना० ५फल.

४०९ स्फाय्. (ई) ह्यर्थ ना० १ फेन. वि० २फेनिल.

४१० फुल्ल्. (अ) फुलणें भू० १प्रफुल्लित २उत्फुल्ल ३प्रफुल्ल.

ब.

४११ बण्. (अ) ध्वनिकरणें. ना० १बाण (शर)

४१२ बध्. (अ) बंधनार्थ ना० १बधिर (बहेरा) वि० २बधिर

४१३ बंध्. (अ) बांधणें भू० १बध्द २संबध्द ३अबध्द वि० ४बंधुर (अंमसलल) ५बध्दक ६ संबंधी ना० ७प्रबंध ८संबंध.

९अनुबंध १०निर्बंध ११निबंध १२बंधु भा० १३बंधन १४निबंधन.

४१४ बल्. (अ) शक्तिअसणें वि० १बलवान् २प्रबल ३सबल ४दुर्बल ५निर्बल ६बली ७बलिष्ट ८बलियस् ना० ९बलाका १०बल (शक्ति, सैन्य) ११अबला (स्त्री).

४१५ बाध्. (क) विलोडन पराभव करणें भू० १बाधित २अबाधित ३निर्बाधित वि० ४अबाध ५निर्बाध ६बाधक ना० ७बाध ८बाधा ९बाहू (भुज) भा० १०बाधन.

४१६ बिद्. (इ) विभाग होणें ना० १बिंदु.

४१७ बिल्. (अ) भेदन करणें ह्म० भोंक पाडणें ना० १बिल २बिलेशाय (सर्प) ३बिल्व (बेल)

४१८ बीज्. (अ) उत्पन्न होणें वि० १सबीज २निर्बीज ३बीजाकृत ना० ४बीज.

४१९ बुध्. (इर) बोधन ह्म० जाणणें, समजणें भू० १बोधित २प्रबोधित वि० ३बोधक ना० ४बुद्धि वि० ५सुबुद्धि ६बोध भा० ५बोधन.

४२० बुध्. (अ) जाणणें भू० १बुद्ध २प्रबुद्ध ३सुबुद्ध ४अप्रबुध्ध ५निर्बुद्ध ६उद्बुध्ध ७दुर्बुध्ध वि० ८सुबोध ९दुर्बोध १०बोध्य ११बोधनीय १२बोधक १३उद्बोधक १४बोध्धा १५प्रबोधक

ना० १६ बोधक १७ बुध १८ उद्बोध १९ विबुध २० प्रबोध २१ अप्रबोध भा० २२ प्रबोधन २३ संबोधन २४ बोधन.

४२१ बृह्. (अ) वृद्धिहोणें ना० १ ब्रह्म २ वर्ह (मोराचें पीस) ३ ब्राह्मण. वि० बृहत्.

४२२ बृह्. (इ) उद्योगकरणें ना० १ ब्रह्मा २ बृहती (छंदविशेष)

४२३ बुस्. (अ) त्यागअर्थ. बुस्. बुष् यावरून प्राकृत भूंस.

भ

४२४ भज्. (अ) सेवाकरणें भू० १ भक्त २ अभक्त वि० ३ सुभग ४ दुर्भग ५ भजमान ना० ६ भग ७ भक्ति ८ भाग्य भा० ९ भजन.

४२५ भज्. (अ) विश्राणन ह्मणजे विभाग करणें भू० १ विभक्त २ अविभक्त वि० ३ विभाज्य ४ अविभाज्य ५ विभाजक ६ भाज्य ७ भाजक ना० ८ भाजन ९ भाग १० विभाग ११ विभक्ति भा० १२ विभजन (तुकडे करणें)

४२६ भंज्. (ओ) आमर्दन ह्म० नाश करणें भू० १ भग्न वि० २ अभंग ३ भंगुर (मोडलेलें) ना० ४ भंग ५ भंजन ६ प्रभंजन भा० ७ भंजन.

४२७ भट्. (अ) भृति ह्म० पोषण करणें ना० १ भट (शिपाई)

४२८ भट्. (अ) वादविवाद करणें ना० १ भट्ट (वेदादिविद्या संपन्न) २ भट्टीनी.

४२९ भड्. (इ) विनोद, विवाद करणे, ना० १ भंडन यावरून प्राकृत भांडण.

४३० भण्. (अ) ह्मणणे भू० १ भणित (बोललेलें) ना० २ भणिति ३ भाण-
(काव्यविशेष)

४३१ भद्. (इ) कल्याण, सुख, ना० १ भद्र (कल्याण)

४३२ भल्. (अ) हिंसार्थ भल्ल, भल्लूक (आस्वल) ना० १ भाल्लूका (भाल्लु०)

४३३ भर्त्स्. (अ) हेळणा करणें भू० १ भर्त्सित. २ निर्भर्त्सित वि० ३ निर्भर्त्स
क ना० ४ निर्भर्त्सना भा० ५ भर्त्सन

४३४ भस्. (अ) दीप्ती अर्थ ना० १ भस्त्रा (भाता)

४३५ भक्ष्. (अ) भक्षण करणें भू० १ भक्षित वि० २ भक्ष्य ३ अभक्ष्य ४
दुर्भक्ष्य ५ भक्षणीय ६ अभक्षणीय ७ भक्षक भा० ८ भक्षण.

४३६ भा० प्रकाशणें ना० १ प्रभा भा० २ दुंदुभी ३ भानु ४ प्रभात भ०
(नक्षत्र)

४३७ भाष्. (अ) बोलणें भू० १ भाषित २ संभाषित वि० ३ भाष्य ४ बहु
भाषी ना० ५ भाषा ६ परिभाषा ७ भाषण ८ दुर्भाषण ९ सुभाष
ण १० संभाषण यावरून प्राकृत भाकित.

४३८ भास्. (अ) प्रकाशणें भू० १ भासित २ आभासित वि० ३ भास
मान ४ भास्वर ५ भासुर ६ भासक ना० ७ भास्कर ८ भास ९
आभास १० विभास भा० ११ भासन.

४३९ भिद्. (इर) विदारण करणें भू० १ भिन्न २ अभिन्न ३ उद्भिन्न ४ उ

छिद वि० १भिदुर २भिन्न ७ भेदक ८ भेद्य ९ भेदनीय १० निर्भे द्य ११ अभेद्य १२सुभेद्य १३ भेदी. ना० १४भित्ति (भींत) १५ भेद १६ प्रभेद १७ अभेद १८ भिदा भा० १९ भेदन.

४४० भिषज्. चिकित्सा स्न० औषधदेणें ना० १भिषक् (वैद्य) २ भेषज (औषध) ३ भैषज्य (औषध) ४ भैषज्य (वैद्यक्रिया)

४४१ भिक्ष्. (अ) भिक्षामागणें वि० १ भिक्षु २भिक्षुक ना० ३भिक्षा ४ दुर्भिक्ष (महांगाई) ५सुभिक्ष (स्वंगाई)

४४२ (जी) भी. भिणें, भयघालणें भू० १ भीत. वि० २भीषणा ३निर्भय ४ सभय ५भयानक ६ भीरु ७ भयंकर ८ बीभत्स ना० ९भीष्म १० भीम ११ भीति १२ भय १३ अभय

४४३ भुज्. (ओ) वांकडें होणें ना० १ भुजंगम २भुजंग (सर्प) वि० ३भु ग्न.

४४४ भुज्. (अ) पालन, उपभोग, करणें भू० १ भुक्त २ अभुक्त वि० ३ भोज्य ४अभोज्य ५भोक्ता ६ भोगी ७ भोग्य ८ अभोग्य ९ भुजि ष्य १० भुजिष्या ११ भुंजान ना० १२ भोग १३ संभोग १४उपभोग १५भोजन १६ भुज (बाहु)

४४५ भू. होणें भू० १ भूत. २ अभूत ३उद्भूत ४ अनुभूत ५आवि र्भूत ६संभूत ७पराभूत ८अभिभूत ९ परिभूत १० प्रभूत ११ भावित. १२ संभावित वि० १३ प्रभु. १४ भव्य १५ भवितव्य १६ अ

द्भूत १७ भावी १८ संभवी १९ संभाव्य २० अनुभाविक २१ अनुभवि २२ सानुभव २३ निरनुभव २४ विभ्र २५ भावुक २६ भविष्णु २७ असंभवि २८ विभावनीय २९ भाव्यमान ३० भविष्य **ना०** ३१ भाव ३२ परभू ३३ अभाव ३४ प्रभाव ३५ भभव ३६ पराभव ३७ अनुभव ३८ संभव ३९ अनुभूति ४० आविर्भाव ४१ विभव ४२ भवन ४३ भावना ४४ संभावना ४५ अभिभव ४६ अनुभाव ४७ परिभव ४८ परिभाव ४९ वैभव ५० भूमिः ५१ भुवन ५२ भू (पृथ्वी) **वि०** ५३ भूष्णु.

**४४६ भूष्.** (अ) अलंकार करणें, शोभविणें. **भू०** १ भूषित २ सभूषित **वि०** ३ भूषक. ४ भूषित. **ना०** ५ भूषा ६ भूषण.

**४४७ भृ.** (अ) भरणा, पोषण, करणें **भू०** १ भृत २ संभृत **ना०** ३ भृत्य ४ भृतक ५ भृती (वेतन) **भा०** ६ भरण.

**४४८ (डु) भृ.** (अ) धारण पोषण करणें **ना०** १ भार २ अभ्र ३ आभरण (अलंकार) ४ संभार ५ भर्त्ता ६ भृंग ७ भृंगार (सोन्याची झारी) ८ भार्या ९ भारती (वाचा) यावरून भाकृत आभारी, भारी, आभार.

**४४९ भृज्.** (ई) भाजणें **भू०** १ भजित **भा०** २ भर्जन नाम भर्ग (कामदिजाणें जाळिलेतो)

**४५० भ्रम्** (उ) भ्रमण करणें **भू०** १ भ्रमित **ना०** २ भ्रमर **भा०** ३ भ्रमण

४ परिभ्रमण.

४५१ भ्रम्. (उ) स्थिर न राहाणें भू० १ भ्रांत २ भ्रमित वि० ३ भ्रमिष्ट ४ भ्रामक ५ भ्रमी ना० ६ भ्रम ७ विभ्रम ८ परिभ्रम ९ संभ्रम.

४५२ भंज् (ओ) आमर्दनें मर्दनकरणें ना० १ प्रभंजन (वायू)

४५३ भ्रसज्. पाकार्थ भृगु (पर्वताचा तुटलेला कडा)

४५४ भ्रंश. (अ) खालीं पडणें भू० १ भ्रष्ट २ भ्रंशित ना० ३ भ्रंश ४ अपभ्रंश भा० ५ भ्रंशन.

म.

४५५ मक्. (इ) शोभार्थ ना० १ मुकुट.

४५६ मख्. (अ) जाणें, हालणें ना० १ मख (यज्ञ)

४५७ मग्. (इ) मंडण, शोभा, करणें, ना० १ मंगल.

४५८ मच्. (इ) धारणकरणें ना० १ मंचक

४५९ मज्. (इ) ध्वनिकरणें. वि० १ मंजुल. मंजु.

४६० मठ्. (अ) राहाणें ना० १ मठ याव० भा० मठी

४६१ मड् (इ) अलंकृत करणें, शोभविणें. भू० १ मंडित. ना० २ मंडल (सभा) ३ मंडप ४ मंडली ५ मंडलाग्र (तलवार) ६ मंड (मठा) भा० ५ मंडना ६ मंडन.

४६२ मन्त्र्. (इ) मसलतकरणें भू० १ आमंत्रित २ निमंत्रित वि० ३ मंत्री. ना० ४ मंत्र (मसलत) भा० ५ आमंत्रण ६ निमंत्रण (आवश्यक)

४६३ मथ्. (अ) क्लेशदेणें भू० १ मथित भा० २ मथन.

४६४ मंथ्. (अ) घुसळणें ना० १ मंथ (माथ्या) भा० २ मंथन यावरून माहून माथणी.

४६५ मद्. (इ) स्तुति आनंद करणें ना० १ मंदार (कल्पवृक्ष)

४६६ मद्. (ई) हर्ष होणें भू० १ मत्त २ प्रमत्त ३ उन्मत्त. वि० ४ मादक ५ मद्यपी ६ उन्मादक ना० ७ मदिरा ८ मद ९ मद्य १० मदन ११ प्रमाद १२ प्रमदा (स्त्री) १३ मद्र. (देशविशेष) भा० १४ उन्मादन.

४६७ मन्. (अ) ज्ञान होणें, मनन करणें. भू० १ संमत २ अनुमत ३ अभिमत वि० ४ मान्य ना० ५ मन ६ मति ७ मुनि ८ मत ९ अभिमत १० मीमांसा ११ संमति १२ अनुमति भा० १३ मनन.

४६८ मय्. (अ) गत्यर्थ. ना० १ मयूर.

४६९ मल्ल्. (अ) धारण करणें ना० १ मल्ल (जेठी) २ मल्लिका (मोगरी)

४७० मल्. (अ) धारण करणें वि० १ मलीन २ विमल ३ निर्मल ४ अमल ना० ५ मल ६ परिमल.

४७२ मक्ष्. (अ) शब्द करणें ना० १ मक्षिका (माशी) २ माक्षिक (मध)

४७३ मस्. (ई) परिणामार्थ ना० १ मस्त २ मस्तक ३ मषि ४ मसूर वि० ५ मसृण (ओलें)

४७४ (टु) मस्जू. (ओ) स्वच्छ, पवित्र होणें, बुडीमारणें, (मज्ज) भू०

१मग्न २निमग्न ३मज्जित ना० ४मज्जा भा० ५मज्जन ६मं

४७५मह्.(अ) मानदेणें वि० १महत् २महान् ना० ३मही (पृथ्वी)
४७६मा.(कृ) मापणें, यजन करणें, ध्वनिकरणें भू० १मित २अमित ३निर्मित ४परिमित ५अनुमित ६मनीत वि० ७समान ८उनमेय ९निरुपम १०प्रमाणिक ११अप्रमाणिक १२अपरिमित १३प्रमेय ना० १४मान १५प्रमाण. १६विमान १७प्रतिमा १८उपमा १९परिमाण २०अनुमितिः २१अनुमान २२उपमान २३माता २४समा (वर्ष) २५माप्य २६उन्मान (तोलणें) २७मेरु:
४७७मान्.(अ) सन्मान देणें पूजाकरणें. भू० १मानित २सन्मानित ३अवमानित. वि० ४मान्य ५अमान्य ६मानी ७अभिमानी ८दुरभिमानी ९निरभिमानी ना० १०माना ११अभिमाता १२दुरभिमानि १३मान १४अवमान १५संमान भा० १६संमानन १७मात्रा.
४७८मार्ग्.(अ) शोधणें ना० १मार्गण. (बाण) वि० २मार्गित.
४७९मार्ज्.(अ) ध्वनिकरणें ना० १मार्जार.
४८०(श्रि) मिद्.(आ) स्नेहनार्थ ना० १मेदिनी २मेद वि० ३मेदुर.(थोर)
४८१मिल्.(अ) संयोग पावणें भू० १मिलित २मेलित वि० ३दुर्मिल भा० ४मेलन ५संमेलन ना० ६मेला (जोडी)

४८२ मिश्र. संपर्क होणें, एकत्र करणें भू० १ मिश्रित २ संमिश्र. वि० ३ मिश्र भा० ४ मिश्रण ५ संमिश्रण ना० ६ मिश्रेया (बडि शेप)

४८३ मिष्. (उ) ग्रहण करणें वि० १ मिष्ट.

४८४ मिष्. (अ) स्पर्धा करणें, टक्करणें, खेळणें ना० १ मेष (मेंढा)

४८५ मिह्. (अ) सेचन करणें ना० १ मेघ.

४८६ मी. (ऋ) हिंसा करणें ना० १ मीन (मासा) २ मीनकेतन.

४८७ मील्. (अ) मिचकावणें. भा० १ मीलन २ संमीलन ३ उन्मीलन.

४८८ मुच्. (ऌ) प्रमोचन ह्म० सोडणें, मुक्त करणें भू० १ मुक्त २ विमुक्त ३ मोचित वि० ४ मुमुक्षु ना० ५ मोक्ष ६ मुक्ति भा० ७ मोचन ८ प्रमोचन ९ मोक्षण वि० १० मुकुर ११ मुकुल.

४८९ मुट्. (अ) मर्दन करणें. यापासून झाकून मुटकणें.

४९० मुड्. (ड) पवित्र होणें, कापणें. भू० १ मुंडित. वि० २ मुंडी ना० ३ मुंडी (संन्यासी) भा० ४ मुंडन.

४९१ मुद्. (अ) हर्ष होणें भू० १ मुदित २ मोदित ३ अनुमोदित. वि० ४ मोदक. ना० ५ कुमुद ६ प्रमोद ७ आमोद.

४९२ मुद्. (अ) मिसळणें ना० १ अनुमोदन.

४९३ मुर्छ्. (आ) मोह पावणें समुच्छ्रित भू० १ मूर्छित ना० २ मूर्च्छा ३ मूर्च्छा (मूर्च्छना भा० ५ मूर्च्छन ५ संमूर्च्छन वि० ६ मूर्च्छाल

७मूर्त.

४९४ मुष्. (अ) चोरीकरणें भू० १मुषित ना० २मूषक (चोर)

४९५ मुस्. (अ) खंडनकरणें (कांडणें) ना० १मुसल वि० २मुसल्य.

४९६ मुह्. (अ) चित्त भ्रमहोणें भू० १मोहित २संमोहित. वि० ३मूढ ४मुग्ध ५मूर्ख ना० ६मुग्धा (स्त्री) ७मोह ८मोहन ९मू

र्धा.

४९७ मूत्र. प्रस्त्रव म्हणजे पाझरणें, लघीकरणें ना० १मूत्र वि० २मूत्रित.

४९८ मूल्. (अ) बळकट होणें, रोवणें भू० १उन्मूलित वि० २निमूल ना० ३मूल. भा० ४उन्मूलन.

४९९ मूष् (अ) चोरी करणें भू० १मूषित ना० २मूषक (उंदीर) ३मूषी (मूस)

५०० मृ. (कु) मरणें (मर, मार) भू० १मृत वि० २मारक ना० ३अम र (देव) ४मारुत. ५मृत्यु. ६अपमृत्यु ७अमर ८अमृत ९मर्त्य भा० ८मरण ९मारण.

५०१ मृग्. (अ) अन्वेषण म्ह० शोधकरणें. वि० १मृग्य. ना० २मृग (हरि ण) ३मृगनाभि. (कस्तूरीमृग) ४मृगमद (कस्तूरी) ५मृगया (शीकार) ६मार्ग ४सन्मार्ग ५कुमार्ग.

५०२ मृज्. (क) पवित्र, स्वच्छ, करणें भू० १संमार्जित ना० २मार्जन.

३संमार्जन ४परिमार्जन ५संमार्जनी (केरसुणी) मार्जारभा०७ मार्ष्टि:

५०३मृद्. (अ) चूर्णकरणें, तुच्छकरणें. भू०१उपमर्दित २मर्दित वि० ३मृदु. ना० ४उपमर्द ५संमर्द भा० ६उपमर्दन ७मर्दन ८संमर्दन.

५०४मृड्. (अ) सुखदेणें ना०१मृड: (सुखदेणारा व महादेव) वि०२ मृडित.

५०५मृश्. (अ) आमर्शन ह्मण० जाणणें ना०१परामर्श २विमर्श भा० ३विमर्शन.

५०६मे. (कू.) अदलाबदल करणें ना०१विनिमय.

५०७ मेधृ. (क्र) त्वरित समजणें वि०१मेधावी २मेधिन् (मेधी) ना०३मेध्य ४अमेध्य ५दुर्मेध्य ६मेधा (बुध्दि.)

५०८म्लेच्छ (अ) अस्फुट, अस्पष्ट बोलणें ना०१म्लेच्छ.

५०९म्लै. हर्षक्षय ह्मणजे धातुक्षय होणें (म्लान होणें) वि०१म्लान ना०२म्लानि भा० ३म्लानता.

## य.

५१०यज्. (अ) यज्ञ, हवन, देवपूजा, दान, करणें वि०१याजक २यजमान ३यष्टा ४यज्वा ५याजी ६याज्ञिक ना०७याग ८यज्ञ ९अयाग १०ऋत्विज भा०११यजन १२याजन.

५११ यत्. (ई) प्रयत्न करणें ना० १आयतन (घर) २यति ३यत्न ४प्रयत्न भा० ५प्रयतन वि० ६आयत (लांब) ७आयत्त (स्वाधीन)

५१२ यन्त्र्. (इ) संकुचित करणें भू० १यंत्रित २नियंत्रित वि० ३अयंत्र. ना० ४यंत्र भा० ५यंत्रण (दाबून धरणें)

५१३ यम्. (अ) स्वाधीन ठेवणें. भू० १नियत २संयत ३उद्यत ४नियमित वि० ५संयमी ६नियंता ७नियामिक ८नियम्य ना० ९यम १० यती (संन्याशी) ११नियम १२ उद्यम १३संयम १४उपयम भा० १५नियमन १६संयमन १७उपयमन.

५१४ यम्. (अ) वेष्टित करणें वि० १उपरमार्थक ना० २आयती (उत्तरकाळ) ३आयाम ४व्यायाम

५१५ यस्. (उ) प्रयत्न करणें. वि० १प्रयासी ना० २आयास ३प्रयास.

५१६ यक्ष्. (अ) पूजा करणें, सन्मान देणें ना० १यक्ष २यक्षिणी.

५१७ या. जाणें, पावणें भू० १अनुयात २नियात ३आयात ४प्रयात. वि० ५अनुयायी. (मागून जाणारा) ना० ६यातना ७याम (प्रहर) ८यामि (बहिण) ९यामिनि (रात्र) १०यान (कोणतेंही वाहन) ११उद्यान (बाग) भा० १२प्रयाण १३उद्यापन १४निर्याण १५यात्रा.

५१८ (टु) याच्. (ऋ) याचना करणें (मागणें) भू० १अयाचित २याचित वि० ३याचक ना० ४याचना ५याञ्चा.

५१९ यु.(अ) बंधनकरणें ना० १ युति २ अयुन

५२० यु० मिश्र, पृथक्, करणें. भू० १ युत २ युक्त ना० ३ यव (जव) ४ योत्रं (बोकड बांधण्याची दोरी)

५२१ युज्. (अ) समाधी लावणें (चित्तवृत्तीचा निरोध करणें) वी० १ योगी २ योग्य ना० ३ योग.

५२२ युज्. (उ.) संयोगकरणें भू० १ युक्त २ प्रयुक्त ३ संयुक्त ४ वियुक्त ५ युक्त ६ उद्युक्त ७ उपयुक्त ८ अभियुक्त वि० ९ योजक १० वियोजक ११ संयोजक १२ संयोगी १३ वियोगी १४ उद्योगी १५ उपयोगी. ना० १६ युग्म १७ योग १८ प्रयोग १९ संयोग २० वियोग २१ उद्योग २२ उपयोग २३ प्रयोजन २४ कुयोग २५ सुयोग २६ अभियोग २७ विनियोग २८ योजना. भा० २९ संयोजन.

५२३ युज्. (अ) संयमन करणें, आटोक्यांत ठेवणें. भू० १ नियोजित २ नियुक्त वि० ३ नियोजक ना० ४ नियोग (आज्ञा, गौणविवाहप्रकार) भा० ५ नियोजन.

५२४ युध्. (अ) संप्रहार ह्मणजे युध्य करणें भू० १ योधित वि० २ युध्य ३ योध्या ना० ४ युध्य ५ आयुध ६ आयोधन.

५२५ युष्. (अ) सेवा (चाकरी) करणें ना० १ योषा (स्त्री) २ योषित् (स्त्री) ३ योषिता.

र.

५२६ रच्. रचनाकरणें भू० १ विरचित ना० २ रचना.

५२७ रंज्. (अ) रंगवणें (रक्त राग) भू० १ रंजित वि० २ रक्त ३ आरक्त ४ अनुरक्त ५ विरक्त ६ उपरक्त ७ रंजक ८ विरागी ९ अनुरंजक ना० १० अनुराग ११ राग १२ उपराग (३ रंजक) १३ रजक १४ रजत १५ रंक १६ रक्त भा० १७ रंजन. १८ अभिरंजन १९ रंजन.

५२८ रण्. (अ) शब्द, नाद, ध्वनि, करणें ना० १ रण २ रणत्कार

५२९ रद्. (अ) भेद करणें फोडणें. ना० १ रदन २ रद ३ रदनछद.

५३० रप्. (अ) व्यक्तवागार्थे ना० १ रिपु (शत्रु)

५३१ रभ्. (द) नाद, ध्वनि, करणें ना० १ रंभा.

५३२ रभ्. (अ) आरंभ करणें भू० १ आरब्ध २ मारब्ध वि० ३ आरभ्यमाण ना० ४ मारब्ध ५ आरंभ ६ मारंभ ७ समारंभ ८ संरंभ. भा० ९ संरंभण.

५३३ रभ्. (अ) राभस्यार्थ. ना० १ रभस (वेग.

५३४ रम्. (उ) क्रीडा करणें (खेळणें) भू० १ रत २ अनुरत ३ उपरत वि० ४ रमण ५ रमणीय ६ रम्य ना० ७ क्षरत ८ राम ९ रामा १० रमण ११ आराम १२ विराम १३ रति १४ उपरम १५ उपरति ना० रत्न १७ रथ १८ रमणा (स्त्री)

५३५ रय्. (अ) गति, वेग. ना० १ रय: (वेग)

५३६ रस्. (अ) शब्दार्थ ना० १ रशना (दोरी)

५३७ रस्. रुचि घेणें वि० १ रसिक २ अरसिक ३ विरस ४ सरस ५ नीरस ६ स्वरस ना० ७ रस (रुचि) ८ रसना (जीभ) ९ रस ज्ञ १० रसज्ञा भा० ११ स्वारस्य १२ रसन.

५३८ रह्. (अ) त्यागकरणें भू० १ रहित.

५३९ रंह्. (इ) गति अर्थ ना० १ रंहस् (वेग)

५४० रक्ष्. (अ) रक्षणकरणें भू० १ रक्षित २ संरक्षित ३ सुरक्षित वि० ४ रक्षक ५ रक्ष्य ६ रक्षिता ७ परिरक्षणीय ना० ८ रक्षा ९ राक्षस (रक्षंत्यस्मादिति) भा० १० रक्षण ११ संरक्षण १२ परिरक्षण.

५४१ रंध्. (अ) हिंसार्थ. ना० १ रंध्र (छीद्र) वि० २ रंधित.

५४२ राज्. (क) प्रकाशणें भू० १ विराजित ना० २ राज्य ३ राजा ४ स्वराः

५४३ राध्. (अ) वाढणें, वृद्धिपावणें भू० १ आराधित वि० २ आराध्य ३ आराधनीय ना० ४ आराधना ५ समाराधना भा० ६ आरा धन.

५४४ राध्. (अ) परिपूर्ण करणें वि० १ अपराधी ना० २ अपराध ३ राद्धांत (सिद्धांत) ४ राध (वैशाखमास)

५४५ रास्. (क) शब्द करणें ना० १ रासभ (गाढव)

५४६ री. जाणें ना० १ रेणु २ त्रसरेणु ३ रेत ४ रेफ ५ रीति.

५४७ रिख्. (अ) रेखार्थ ना० १ रेखा वि० २ रेखित भा० ३ रेखनः

५४८ रिग्. (इ) रांगणें भा० १ रिंगण यावरून प्राकृत रांगणें.

५४९ रिचू. (इर) रिकामें होणें भू० १ रिक्त २ अतिरिक्त ३ रेचित वि० ४ रेचक ना० ५ अतिरेक ६ व्यतिरेक भा० ७ रेचन ८ विरेचन.

५५० रिफ्. (अ) निंदा हिंसा, करणें, ना० १ रेफ (रकारव्यंजन) २ द्विरेफ (भ्रमर)

५५१ रिषू. (अ) दुखवणें ना० १ रेषा २ रिष्टं (कल्याण)

५५२ री. (ङ) जाणें भा० १ राणं (स्रवलेलें)

५५३ रु शब्दकरणें (रवु, रावू) ना० १ रोक (छीद्र) २ रावण ३ रव यापासून प्राकृत आरवणें, आरडणें वि० ४ रवण.

५५४ रु (ङ) गति अर्थ ना० १ रवि (सूर्य)

५५५ रुचू. (अ) प्रकाशणें संतुष्टकरणें वि० १ रुच्य २ रुचिर (सुंदर) ना० ३ रुचि ४ रुक् (कांति) ५ अरोचक.

५५६ रुज्. (ओ) भंग व दुःखहोणें भू० १ रुग्ण वि० २ रोगी ३ निरोगी ना० ४ रोग भा० ५ आरोग्य ६ आरोग्यता ७ रोचि (कांति)

५५७ रुद्. (इर्) रडणें भू० १ रुदित २ रोदित भा० ३ रोदन ना० ४ रोदसी (स्वर्ग पृथ्वी) ५ रुद्र वि० ६ रौद्र (भयंकर)

५५८ रुध्. (इर्) प्रतिबंधकरणें. भू० १ रुद्ध २ निरुद्ध ३ विरुद्ध ४ अविरुद्ध वि० ५ रोधक ६ विरोधी ना० ७ रोध ८ अवरोध ९ निरोध १० विरोध ११ उपरोध १२ रुधिर १३ अनुरोध.

५५९ रुप्. (उ) स्थापणें भू० १ आरोपित वि० २ आरोप्य ३ आरोपक ४ आरोपी ना० ५ आरोप ६ रोप भा० ७ आरोपण ८ रोपण.

५६० रुश्. (अ) हिंसार्थ वि० १ रुशत् (वाईट भाषण)

५६१ रुष्. (अ) रागें भरणें भू० १ रुष्ट वि० २ रोषी. ना० ३ रोष.

५६२ रुह्. (अ) बीजापासून उत्पन्न होणें, प्रसिद्ध होणें भू० २ रूढ ना० ३ प्ररोह ४ रूढि ५ आरोह भा० ६ आरोहण ७ अवरोहण. ना० ८ रोम (लव)

५६३ रूप. रूप देणें, विस्तार, निरूपण, करणें वि० १ सरूप २ अनुरूप (सारखें) ३ विरूप ४ स्वरूप ५ कुरूप ना० ६ रूपक ७ रूप ८ रूप्य (रुपें) भा० ९ निरूपण.

५६४ रूक्ष. कठोर अस्निग्ध होणें वि० १ रूक्ष (प्राकृत रुक्ष)

५६५ रेष्. (अ) अस्पष्ट ध्वनि करणें यापासून प्राकृत रेंकणें.

५६६ रै. गत्यर्थ ना० १ राका (पौर्णिमा)

## ल.

५६७ लग्. (ए) सन्निध असणें भू० १ लग्न २ संलग्न ना० ३ लग्नक (जामीन)

५६८ लघ्. (इ) जाणें, अन्न न खाणें भू० १ उल्लंघित २ लंघित वि० ३ उल्लंघ्य ४ उल्लंघनीय भा० ५ लंघन ६ उल्लंघन ना० ७ लघु भा० लघुत्व. ८ लंघन.

